Indian Boy-Scouts' Series,-I.

बालवीर-ग्रंथमाला,-१.

# बंगाली वीरांच्या कथा.



लेखक

**अनंत विठ्ठल आपटे**, बी. ए., एस. टी. सी. डी.,

स्काउटमास्तर, श्रीहनुमानपथक, पुणें,

आणि

शिक्षक, ट्रेनिंग कालेज फार मेन, पुणें.

---

प्रकाशक

**नारायण विठ्ठल आपटे**,

व्यवस्थापक, आपटे आणि मंडळी, ५५२, नारायण पेठ, पुणें.

---

मुद्रक

**गणेश काशीनाथ गोखले**, सेक्रेटरी, **श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स**,

४९५, शनिवार पेठ, पुणें.

---

१९२४.

---



---

**किंमत पांच आणे.**

# प्रस्तावना.



बालवीरानें आपलें वर्तन कसें ठेवावें ह्याविषयीं मुलांस उपदेश करीत असतां खऱ्या, प्रत्यक्ष घडलेल्या, गोष्टी सांगणें अवश्य असतें. अशा गोष्टी पुराणांत व इतिहासांत जागोजाग हव्या तितक्या आढळतात. परंतु त्या ऐकून मुलांच्या मनावर इष्ट तो परिणाम घडतोच असें नाहीं. पुराणांतील विभूतींची व ऐतिहासिक थोर पुरुषांची सर आपणांस येणें बहुधा अशक्य अशी मुलांची समजूत असते, ह्यास्तव अगदीं अलीकडच्या—म्हणजे गेल्या पन्नाससाठ वर्षांतल्या—माणसांच्या नित्य व्यवहारांतल्या आचरणांतील गोष्टी एथें मुद्दाम निवडून घेतल्या आहेत.

हिंदुस्तान हा एक अफाट देश असून त्यांत जाती, पोटजाती ह्याही शेंकडोशें! अर्थात् एका प्रांतांतील बालवीरांच्या मनांत दुसऱ्या प्रांतांतील बालवीरांविषयीं भ्रातृभाव उत्पन्न होण्यास त्या त्या प्रांतांतील थोर विभूतींच्या उपदेशपर कथा त्यांच्या कानावर जाणें फार अगत्याचें आहे; ह्यासाठीं बंगाली, पंजाबी, रजपूत, कानडी, वगैरे वीरांच्या कथा महाराष्ट्रीय बालवीरांस ऐकविण्याचा प्रयत्न होणें जरूर आहे. अशा वाङ्मयाचा बालवीरांस व बालवीरशिक्षकास निःसंशय फार उपयोग होईल.

शाळांतून सामान्यतः नीतिशिक्षण देण्यासही ह्या कथा उपयोगीं पडतील. तसेंच ह्या कथांच्या वाचनानें मुलांचें मनोरंजन होऊन त्यांच्या मनावर उत्कृष्ट नीतितत्त्वांचा ठसाही चांगला उमटणार असल्यामुळें हें पुस्तक शाळाधिकारी, शिक्षक व पालक मुलांमुलींच्या हातीं अवश्य देतील अशीही मला उमेद आहे.

पुणें, तारीख १५ नोव्हेंबर १९२४. } **अनंत विठ्ठल आपटे.**

---

# अनुक्रमणिका.

# बंगाली वीरांच्या कथा.

## १. शब्दाचें मोल.

प्रसिद्ध बंगाली सावकार कृष्णचंद्र पौती यांनीं एकदां एका इंग्रज व्यापाऱ्याला तांदूळ पुरविण्याचा मक्ता घेतला होता. कर्मधर्मसंयोगानें त्याच वर्षीं सगळ्या बंगालभर अतिवृष्टि होऊन शेतीचें नुकसान झालें, व तांदुळाचा भाव बेसुमार वाढला. मक्ता घेतांना तांदुळाच्या भावांत अशी दुप्पटी तिप्पटीनें वाढ होईल अशी कोणासच कल्पना नव्हती, यामुळें ह्या मक्त्यासंबंधीं लेखी करारमदार झालेला नव्हता.

भाव विलक्षण कडकलेला, जवळ लेख तर कांहींच नाहीं, अशा स्थितींत कृष्णचंद्रांजवळ तगादा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें पाहून इंग्रज व्यापारी स्वस्थच बसला होता; परंतु हें कृष्णचंद्रांसारख्या सत्यप्रतिज्ञ गृहस्थास कसें रुचावें? वायद्याचा दिवस उगवतांच कृष्णचंद्रांनीं त्या इंग्रज व्यापाऱ्यास बोलावणें पाठविलें. हें बोलावणें आलेलें पाहून इंग्रज व्यापारी बुचकळ्यांत पडला. कृष्णचंद्रांनीं आपणांस कशाला बोलाविलें असेल, याचा त्यास कांहींच उमज पडे ना. तो कृष्णचंद्रांच्या भेटीस गेला. तेव्हां ते म्हणाले, "तुमच्या वायद्याचा दिवस आजचा आहे. तुम्ही आपला तांदूळ कराराप्रमाणें ठरलेल्या भावानें घेऊन चला." त्या इंग्रज व्यापाऱ्यास प्रथम ही सर्व थट्टाच वाटली. कांहीं वेळानें त्याचा संशय दूर झाला, पण कृष्णचंद्रांच्या सौजन्याचा असा भलताच फायदा घेण्यास

तो व धजेना, तो तांदूळ नेण्याच्या बाबतींत कांकूं करूं लागला. हें पाहतांच कृष्णचंद्रांनीं आपल्या स्वताच्या नौकरांकरवीं त्याच्या वखारींत तांदुळाचे गोण पाठविण्यास आरंभ केला. कारण, आपण एकदां ज्या वचनानें बद्ध झालों, त्या वचनाची योग्यता पांढऱ्यावर काळें केलेल्या चिटोऱ्यापेक्षां कमी आहे असें त्यांचें मन त्यांस सांगे ना. सरते शेवटीं ठरलेल्या रकमेचा चालू बाजारभावाप्रमाणें माल पदरांत पडतांच त्या इंग्रज व्यापाऱ्यानें अधिक माल घेण्याचें साफ नाकारिलें, व उलट कृष्णचंद्रांस निरोप पाठविला, कीं " महाराज, आपणांपासून अधिक माल घेणें म्हणजे परमेश्वराच्या घरीं अपराध करणें होय; व आपल्या सौजन्याचा गैरवाजवी फायदा मीं घेतल्यास माझें तांदुळानें भरलेलें जहाज समुद्रास्तृप्यन्तु झाल्याशिवाय राहाणार नाहीं, असें माझें मन मला सांगतें; सबब कृपा करून अधिक तांदूळ पाठविण्याचें बंद करा ! "

ज्या भरतखंडांत हरिश्चंद्रासारखा सत्यप्रतिज्ञ राजा होऊन गेला, त्या देशांत कृष्णचंद्रांसारखीं शब्दाचें मोल मानणारीं माणसें निर्माण होणारच.

---

## २. भूतदया.

पुणें शहरांत जसें महर्षि अण्णा साहेब पटवर्धन यांचें नांव, तसें दिनाजपुरांत विद्यारत्न भुवन मोहन मार यांचें नांव आबालवृद्धांच्या तोंडीं असे. ते आजन्म ब्रह्मचारी असल्यामुळें त्यांचा स्वताचा असा प्रपंच त्यांस नव्हताच; पण थोर माणसें वसुधैवकुटुंबक वृत्तीचीं असतात, सगळें जग हेंच त्यांना आपल्या कुटुंबाप्रमाणें वाटत असतें, त्याप्रमाणें भुवन बाबूंचेंही असे. त्यांना ' होमिओ-

पाथिक' औषधांची फार चांगली माहिती असून हाताला यशही चांगलें असल्यामुळें गांवांतले सरकारी व खाजगी दवाखाने टाकून लांबलांबचे लोक औषधोपचाराकरितां त्यांच्याकडे येत. रात्रीं, दिवसा भुवनबाबूंकडे रोग्यांना मुक्तद्वार असे. ते औषधाबद्दल अगर रोग-परीक्षेबद्दल रोग्याकडून पैसे कधींच घेत नसत, व केव्हां केव्हां तर ते आपण होऊन रोग्याच्या घरीं जात, यामुळें रावापासून रंकापर्यंत सर्व दर्जाच्या व सर्व पंथांच्या रोग्यांची त्यांच्या दाराशीं गर्दी असे.

एके दिवशीं एका गृहस्थाचा मुलगा फार अजारी असल्यामुळें भुवन बाबूंना आणण्यासाठीं त्यानें एक भाड्याची गाडी पाठविली. त्या वेळीं ऐन दुपारची वेळ असून ऊन बाहेर तोंड काढूं देत नव्हतें. ती गाडी येऊन थडकतांच भुवनबाबूंनीं त्या घामानें डवडवलेल्या गाडी-वाल्याकडे व त्याच्या गाडीला जोडिलेल्या व धापा टाकणाऱ्या दोन जीवांकडे पाहिलें, आणि त्या गाडीवाल्यास गाडी शेजारच्या झाडाखालीं सावलींत सोडून ठेवून थोडी विश्रांति घेण्यास सांगितलें. नंतर ही स्वारी उठली, व कोपऱ्यांतली छत्री उचलून तसल्या त्या उन्हांत पायींच त्या गृहस्थाच्या घरीं हजर झाली! भुवनबाबू चालत आलेले पाहून त्या गृहस्थास मोठें आश्चर्य वाटलें. मीं आपणांसाठीं पाठवि-लेली गाडी चुकून भलतीकडेच गेली कीं काय? असें त्यानें बाबूंस विचारिलें. भुवनबाबूंनीं उत्तर केलें, "छे, गाडी आली म्हणून तर मी आलों; पण तो गाडीवाला व त्याचे ते घोडे उन्हानें इतके व्याकुळ झाले होते, कीं तशा स्थितींत माझ्या एकट्याकरितां त्या तिघां प्राण्यांस उन्हांतून तळमळत आणण्याचें माझ्या फार जिवावर आलें, म्हणून त्याला विश्रांति घेण्यास सांगून मी परभारेंच निघून आलों."

भुवनबाबूंची ही भूतदया किती उदात्त आणि अनुकरणीय आहे बरें?

---

# ३. स्वावलंबन.



एके दिवशीं एक बंगाली गृहस्थ हौऱ्यापासून जवळच असलेल्या एका लहानशा स्टेशनावर पहिल्या वर्गाच्या डब्यांतून खालीं उतरला. त्याच्या त्या थाटावरून तो कोणी तरी बडा सरकारी कामदार असावा असें दिसलें. गाडींतून उतरतांच त्यानें हमाल, ए हमाल, अशा हांका मारण्याचा सपाटा लाविला. त्याच्या त्या आरडाओरडीवरून एकाद्याला असें वाटलें असतें, कीं ह्या गृहस्थाबरोबर कांहीं तरी दहापांच मोठाले बोजे असावेत, व ते एकदांचे गाडी सुटण्यापूर्वीं गाडीबाहेर कसे निघतात अशा विवंचनेंत तो असावा, पण वस्तुस्थिति अगदीं भिन्न होती. त्याच्याजवळ सात शेर वजन भरेल न भरेल इतकीच एक कातड्याची ब्याग होती, व ती जवळच उभ्या असलेल्या गाडींत नेऊन ठेवावयाची होती. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हे जवळच उभे होते. त्या गृहस्थाची ती केविलवाणी स्थिति पाहून त्यांस फार हसूं लोटलें. पंडितजींचा पोषाक नेहमीं फारच साधा असे. अंगांत बंडी आहे आहे, नाहीं नाहीं; पायांत तर कांहीं नसायचेंच ! तो पोषाक या वेळीं त्यांच्या चांगलाच उपयोगीं पडला. ते चटकन पुढें होऊन म्हणाले, काय साहेब, हमाल पाहिजे ? त्या गृहस्थाचा जीव खालीं पडल्यासारखा झाला, व त्यानें पंडितजींस ती ब्याग घेऊन आपल्या मागोमाग येण्यास सांगितलें. पंडितजींनींही घेतलेल्या सोंगाची बतावणी हुबेहूब केली. साहेब बहादुरांची स्वारी स्टेशनाबाहेर येऊन गाडींत विराजमान झाली. त्यांच्या हमालानें ब्याग त्यांच्या शेजारीं ठेविली. हमाली चुकती करण्यासाठीं साहेबांनीं खिशांत हातही घातला; इतक्यांत कांहीं निराळाच प्रकार घडला.

विद्वानांची किंमत विद्वानांनाच कळते. पंडितजींच्या वेशावरून

तो मिजासखोर अधिकारी त्यांना हमाल समजला; पण त्यांच्या त्याही वेशांत तेथें असलेल्या कांहीं सुशिक्षित लोकांनीं पंडितजींना ओळखिलें व ते त्यांच्या भोंवतीं जमून त्यांजवळ विचारपूस करूं लागले.

आपण ज्याला हमाल समजून दोन आण्यांचे पैसे हातावर ठेवणार होतों, तो इसम दुसरा कोणी नसून प्रख्यात विद्वद्रत्न ईश्वरचंद्र विद्यासागर होत, हें कळल्यावर त्याची जी तिरपीट उडाली ती कोठवर वर्णन करावी? त्याचा चेहेरा लज्जेनें काळा ठिक्कर पडला. क्षमा मागून मोकळें व्हावें, तर तोंडांतून शब्द निघेना! शेवटीं पंडितजींनीं आपण होऊनच त्यास जाण्यास निरोप दिला.

पुढें कित्येक दिवसपर्यंत पंडितजींच्या मित्रमंडळींत हा एक करमणुकीचा विषयच होऊन बसला होता. पंडितजी मात्र हा विषय चट्टावारी न नेतां मोठ्या गंभीरपणानें म्हणत, पाहा, आपल्या लोकांना बडेजावरूपी पिशाच्चानें कसें घेरून टाकिलें आहे. आम्हांला जेवल्यानंतर आंचवावयाचें तर हातांवर पाणी घालण्यास नौकर हवा; अर्धा मैल सडकेनें जायचें असलें तरी पायांचा उपयोग करणें लांच्छनास्पद वाटतें, गाडीवाल्यानें अडवून पैसे मागितले तरी आम्ही भरितों, कारण बडेजाव कमी होतो; बाजारांतून दोन पैशांची भाजी आणावयाची तर आम्हांला नौकर लागतो. ही स्थिति भूषणावह आहे असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं.

तरुण पिढीनें ह्या उपदेशाचा अवश्य विचार करावा, तरच बडेजावाचें हें भूत गाडलें जाईल!

---

# ४. प्रसंगावधान.

---:o:---

बंगाल्यांत वनचरपारा हें एक लहानसें खेडें आहे. तेथें एक मोठा धमाढ्य सावकार होऊन गेला. त्यानें प्रेक्षणीय असें एक शंकराचें

देऊळ बांधविलें. देवळाचा घुमट बहुतेक तयार होत आला होता. एके दिवशीं यजमानांची लहर लागली, कीं वर चढून आसपासची शोभा बघावयाची. लगेच ते उठले, आणि मजुरांसाठीं उंच उंच परांच्या बांधून ठेविलेल्या होत्या त्यांवरून सर सर वर जाऊन घुमटाशीं जाऊन पोहोंचले; पण, इतक्या उंचावरून खालीं पाहतांच त्यांस भोंवळ येऊं लागली, व परांच्यावरून आल्या वाटेनें खालीं उतरण्याचा त्यांस हिय्या होई ना, आणि वरही थांबवे ना. तेथें काम करीत असलेल्या मजुरांनीं त्यांची पुष्कळ समजूत केली, व खालीं उतरण्यांत अवघड कांहींच नाहीं असें सांगून पाहिलें. एक मजूर म्हणाला, महाराज, आम्ही या परांच्यावरून ओझीं घेऊन दिवसांतून शेंकडों वेळां चढतों व उतरतों; मग आपल्याला भय कसलें? पाहिजे तर मी पुढें होतों, आपण माझ्या मागोमाग या. आपल्याला खालीं खोल दिसतें म्हणून चक्कर येते. यासाठीं आपण खालीं पाहूंच नका; फक्त ज्या लाकडावर पाय टाकावयाचा त्याकडेच पाहा म्हणजे झालें. सावकाराच्या मनानें एकदां कच खाल्ली ती कायम. त्याचें तोंड गोरें-मोरें झालें, हातपाय लटलट कांपूं लागले, त्याला मृत्यु डोळ्यांसमोर दिसूं लागून तो घळघळां रडूं लागला!

तेथें काम करीत असलेल्या एका गवंड्याला एक नामी युक्ति सुचली. सावकाराची भीति घालवावयाची तर त्याच्या मनांत दुसरी एकादी जोरदार भावना उत्पन्न केली पाहिजे, हा मानसशास्त्रांतील सिद्धांत त्यास अवगत होता कीं काय नकळे! ह्या सावकाराला राग आणणें फार सोपें आहे, असें त्याच्या मनांत आलें, व लगेच तो शिडीवरून कांहीं पायऱ्या खालीं उतरला, व सावकाराकडे वळून त्याला म्हणाला, तुझ्यासारखा लंबकर्ण मी आजपर्यंत कधीं पाहिला नव्हता! तुला एवढी अक्कल नसावी? तुला खालीं उतरतां येत नव्हतें, तर चढावयाचें नव्हतेंस! करीम, पाहातोस काय? दे ह्या

गाढवाच्या कमरेंत लाथ, आणि पडूं दे त्याला कोलमडत खालीं !

अपमान ! एका भिकारड्या गवंड्याच्या तोंडून असले अपमानकारक शब्द ! त्या सावकाराचें रक्त सळसळून गेलें. त्या गवंड्याचीं हाडें नरम करून त्याच्या चुरचुरणाऱ्या जिभेची खोड मोडण्यासाठीं तो एकदम शिडीकडे झपाट्यानें गेला, व त्या गवंड्यास धरण्याकरितां परांच्यावरून झराझर खालीं उतरूं लागला. गवंड्याला तेंच हवें होतें. तोही भराभर खालीं उतरूं लागला. गवंडी पुढें व सावकार मागें अशी ही शर्यत अवघ्या दोनतीन मिनिटांतच संपली. सावकाराचे पाय एकदांचे नीटपणें जमिनीला लागले. गवंडी मात्र चटकन कोठें निसटून गेला. सावकार सुरक्षितपणें खालीं यावा, म्हणून त्या गवंड्यानें ही केवळ एक क्लृप्ति योजिली होती, ही गोष्ट आजूबाजूच्या मंडळींच्या तेव्हांच ध्यानांत आली, व सावकाराचा राग थोडा शांत झाल्यावर ही गोष्ट त्यांनीं सावकाराच्याही नजरेस आणिली, तेव्हां त्यासही मोठी मौज वाटली, व त्यानें त्या गवंड्यास शोधून आणून त्यास चांगलें बक्षीस दिलें.

---

## ५. दानत.



बाबू नियमाधव मुकरजी हे गृहस्थ मुनसफीच्या हुद्यावर होते. त्यांना आपल्या आयुष्याचा विमा उतरावयाचा असल्यामुळें त्यांनीं विमा उतरणाऱ्या एका कंपनीच्या एजन्टास बोलावून आणून त्याच्या मार्फत डाक्टरकडून तपासणी करविली, व आपली शरीरप्रकृति निकोप असून आपल्यास कोणत्याही प्रकारचा आजार नाहीं, असा दाखला मिळविला. डाक्टरानें चांगला दाखला दिल्यावर विमा उतरला जाण्यास दुसरी कांहीं अडचण येतच नाहीं. मुनसफ साहेबांनीं

तिमाही हप्ते पतकरून पुष्कळशा मोठ्या रकमेचा विमा उतरला. सुमारें दोनतीन तिमाही हप्ते भरले गेले नाहींत तोंच मुनसफ साहेबांस दुखण्यानें पछाडिलें व त्यांस दुखण्यांतून वटावण्याची आशा दिसे ना. इतकें मोठें दुखणें एकाएकीं उद्भवणें शक्य नसून त्याचें बीज पूर्वी कांहीं दिवस अंगांत असलेंच पाहिजे; पण नजरचुकीनें म्हणा, अगर हलगर्जीपणानें म्हणा, विमा उतरणाऱ्या कंपनीच्या डाक्टराच्या तें ध्यानांत आलें नसावें; एरव्हीं आपला विमा उतरण्यास कोणीही धजला नसता, असें मुनसफास वाटलें. त्यानें विमा उतरणाऱ्या कंपनीच्या म्यानेजराला सविस्तर पत्र पाठवून आपली हकीगत कळविली, व आपल्या मृत्यूनतर पैसे देण्यास कंपनी बांधिली गेलेली नाहीं, असें स्पष्ट लिहून दिलें !

पुरे वर्षाचे हप्तेही न भरितां घरांत चालून येत असलेल्या द्रव्यावर लाथ मारणाऱ्या या मुनसफाला आमचे व्यवहारचतुर (!) बांधव काय म्हणतील तें म्हणोत; पण सामान्य माणसांनीं लक्षांत ठेवावयाचें तें एवढेंच, कीं दानत म्हणतात ती ही !

---

## ६. सच्छील.

---

घुमरा स्टेशनावरील गोष्ट. आगगाडी स्टेशनांत येऊन उभी राहातांच एक पाऊणशेंएेंशीं वर्षांची गरीब वृद्ध स्त्री तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतून खालीं उतरली. ती इतकी थकली होती, कीं तिला धड उभें राहाण्याचेंही सामर्थ्य नव्हतें. बाई कशीबशी खालीं उतरली खरी, पण तिचें सामानाचें पोतें आंतच बांकाखालीं अडकलें होतें. ती आपल्या दुबळ्या हातांनीं तें ओढून घेण्याची शिकस्त करीत होती, पण एक तर तें बांकाखालीं अडकलें होतें, व गाडींतलीं

ाणसें डब्याचें दारही पुरतें उघडीनात. त्यांत आणखी गाडींत ाढणाऱ्या व उतरणाऱ्या लोकांची धडपड. कांहीं उर्मट माणसें र त्या पोत्यावरच बसूं लागलीं. म्हाताऱ्ये, जा, जा, आतां. राहूं ः पोतें गाडींतच. करायचें काय तुला म्हातारपणीं ते! असे बाष्कळ-णाचे शब्दही मधून ऐकूं येत, पण त्या विचारीला हातभार लाव-यास कोणी पुढें होई ना. गाडी सुटण्याची घंटा झाली; गार्डानें शिटी ़ुंकली, व त्याच्या हातांत हिरवें निशाण फडकूं लागलें. म्हातारी नेराश होऊन धाय मोकलून रडूं लागली. गाडींतलीं माणसें तिची ती दैन्यावस्था पाहून तिला मदत करण्याच्या ऐवजीं फिदीफिदी हसूं लागलीं. सुदैवानें ह्याच डब्याला जोडून मागल्या बाजूस कासिम-बझारचे महाराज मणींद्र चंद्र नंदी यांचा रिझर्व्ह डबा होता. याच वेळीं महाराजांची दृष्टि त्या बाईकडे जाऊन तिची सर्व परिस्थिति महाराजांच्या ध्यानांत आली. ते झटकन डब्यांतून खालीं उतरले, व तिच्या डब्याशीं जाऊन त्यांनीं एका झटक्यासरशीं तिचें पोतें डब्यांतून खालीं ओढिलें, आणि पुन्हा गाडी चालू होण्याच्या आंत आपला डबा गांठिला. आपल्यावर उपकार करणारा माणूस कोण हें त्या गरीब बाईला कळलें सुद्धां नाहीं; कारण, ती भानावर येते, इत-क्यांत गाडी पार निघून सुद्धां गेली !

वास्तविक पाहिलें तर रिझर्व्ह डब्यांतून प्रवास करणाऱ्या बड्या धेंडांनीं बाहेरच्या दीनदुबळ्या माणसांकडे बघावयाचें सुद्धां नाहीं; मग सहा-नुभूतीचें तर नांवच कशाला ? आणि अशा बड्या लोकांनीं स्वहस्तें त्यांच्या उपयोगीं पडणें ही कल्पनासुद्धां कशीशीच वाटते ! पण माणसांमाणसांत प्रकार असतात. शीलवंतांचें शील त्यांस डोळ्यांवर कातडें ओढून स्वस्थ बसूं देत नाहीं, हेंच खरें.

---

# ७. मातृभक्ति.

काशीनाथ गांगुली या नांवाचा एक गरीब बंगाली ब्राह्मण होता. तो ब्रह्मचारी असून आपल्या मातुश्रींची सेवा करण्यांत फार तत्पर असे. तो ज्या गांवीं राहत असे त्या गांवांत पाण्याचें फार दुर्भिक्ष्य होतें. व पाणी फार लांबून आणावें लागे. काशीनाथाची आई दिवसेंदिवस वृद्ध होत चालल्यामुळें तिला इतक्या लांबून पाणी आणण्यास फार कष्ट पडूं लागले, व एके दिवशीं डोक्यावर पाण्याचा हंडा घेऊन येत असतां वाटेंत ती पाय घसरून पडली; व त्यामुळें आजारी पडून लवकरच तिचा अंत झाला. प्रिय मातुश्रींच्या निधनामुळें काशीनाथावर मोठाच दुःखाचा डोंगर कोसळला. त्याला कांहीं सुचे-नासें झालें. आपल्या गांवांत जवळपास पाण्याची सोय नसल्यामुळेंच आपल्या आईस मृत्यु आला असें त्याच्या मनानें घेतलें, व तिच्या वर्षश्राद्धाच्या दिवसापूर्वी आपल्या गांवीं एक प्रशस्त तलाव खण-ण्याचा त्यानें निश्चय केला.

'उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः' या न्यायानें काशी-नाथाचे मनोरथ पूर्ण होणें दुरापास्त होतें. तो स्वतः गरीबच होता, परंतु गांवकऱ्यांच्या व इतर ठिकाणच्या धनिक शेटसावकारांच्या मदतीनें आपण हें काम पार पाडूं अशी त्याला मोठी उमेद होती. गावकऱ्यांजवळ त्यानें ही गोष्ट काढिली, पण ते त्याच्या ह्या वेड-गळ कल्पनेस हसूं लागले!

एथें तलाव होण्यासारखा असता, तर आज इतके दिवस आम्ही स्वस्थ बसलों असतों कीं काय? आतां हा आला मोठा शहाणा आम्हांला शिकवावयाला! अशा अनेक दुरुक्तींनीं त्यांनीं त्याची निर्भ-र्त्सना केली. सरते शेवटीं काशीनाथानें हें अचाट काम केवळ

आपल्या हिंमतीनें पुरें करण्याचें योजिलें, परंतु तलाव खोदण्यास गांवकरी जागा सुद्धां देईनात ! तेव्हां निरुपाय होऊन त्यानें आपलें स्वताचें झोंपडें मोडून टाकून तेथेंच तलाव करण्याचें ठरविलें, व स्वतः कुदळ घेऊन खणण्यास प्रारंभ केला. घरचा मजूर भाडोत्री मजुराच्या चौपट काम करूं शकतो; यामुळें दोनचार महिन्यांच्या अवधींत त्यानें तलावास चांगलेंच स्वरूप आणिलें, परंतु बिचाऱ्याला उन्हाच्या वेळीं बसण्यास सावलीही उरली नाहीं. गांवकऱ्यांनीं तर त्याची गणना वेडयांतच केली होती, यामुळें त्याच्याकडे कोणीच लक्ष देईनासें झालें होतें.

या सुमाराला प्रख्यात दिवाण, श्रीमंत गंगागोविंद सिंह, यांनीं आपल्या मातुश्रींच्या वर्षश्राद्धानिमित्त कुबेरासारख्या मोठमोठ्या देणग्या दिल्याची वार्ता काशीनाथाच्या कानीं आली, व त्याच्या आशेला अंकुर फुटला. एवढा मोठा दाता आपल्या ह्या कृत्याला खात्रीनें हातभार लावील असें त्याला वाटलें, व तो त्या सावकाराच्या भेटीस गेला; परंतु अरेरे ! वाड्यांतील पहारेकरी त्याची व सावकाराची भेटच होऊं देईनात ! सर्व दानधर्म उरकला. आतां वरातीमागून घोडें म्हणतात, तसा तूं आलास, सबब आलास तसा चालता हो; तुला पैसुद्धां मिळणार नाहीं, असें त्याला कारभाऱ्याकडून रोख ठोक उत्तर मिळालें. ह्या उत्तरानें त्या बिचाऱ्या आशेनें आलेल्य ब्राह्मणाचें डोकेंच फिरून गेलें; व धर्मराजाच्या यज्ञानंतर एका मुंगुसानें जशी त्याच्या दानधर्माची अवहेलना केली, तशीच यानेंह त्या सावकाराची मनसोक्त निंदा आरंभिली. मोठा सावकार आल दानधर्म करणारा ! माझ्या आईच्या वर्षश्राद्धासाठीं मी जो स्वार्थ त्याग करीत आहें, त्याची सर ह्या मर्कटाला थोडीच येणार आहे असं निंदाव्यंजक शब्द तो उघड उघड बोलूं लागला. ही गो सावकाराच्या कानांवर गेल्यावर त्यालाही त्या वेड्यापिराच्या धाष्ट्य

बद्दल आश्चर्य वाटलें, व त्याचें म्हणणें तरी काय, हें ऐकून घेण्याच्या इरादानें काशीनाथाला आपल्यापुढें आणून उभें करण्यास त्यानें नौकरांस आज्ञा केली. काशीनाथाला तरी तेंच हवें होतें. तो दिवाणांस नमस्कार करून म्हणाला, "दिवाण साहेब, आपण गोरगरिबाला मोठा दानधर्म केल्याची ख्याति ऐकून मी मोठ्या आशेनें एथें आलों, परंतु मी दोन दिवस उशीरां आलों एवढ्या सबबीवर आपली गांठ पडणेंही मुष्किलीचें झालें. ही काय दात्याची रीत? दुसरें असें, कीं आपण एवढा दानधर्म केला, परंतु त्यानें आपल्या वैभवांत मुळींच वैगुण्य आलें नाहीं. माझी गोष्ट तशी नाहीं. मीं जें धर्मकृत्य आरंभिलें आहे त्या पायीं माझें घरदार नाहींसें होऊन मी उघडा पडलों आहें. मग आतां आपणच सांगा, कीं आपला स्वार्थत्याग जास्त का माझा जास्त? "

नंतर त्यानें आपल्या मातुश्रीच्या मरणाचें कारण व त्यानंतर आपण केलेला संकल्पही त्या सावकारास सांगितला, व तो शेवटीं म्हणाला, महाराज, काय सांगूं, ह्या कामांत अहोरात्र गुंतल्यामुळें मला पोटाला मिळवितां येत नाहीं, यामुळें माझें शरीर असें कृश बनलें आहे; तरी पण जिवांत जीव असेपर्यंत मी आपला हा उद्योग चालू ठेवणार आहें.

काशीनाथाची ही सर्व हकीगत ऐकून सावकाराचा राग पार नाहींसा झाला, व तो म्हणाला, अलबत तुझा हा संकल्प तडीस गेलाच पाहिजे. 'सत्यसंकल्पाचा दाता भगवान' ही म्हण खरी आहे. यापुढें तुझा मनोरथ सिद्धीस नेण्याची जबाबदारी मी पतकरितों. तूं आमच्या पंक्तीस जेवून खुशाल आमच्याच वाड्यांत राहा.

दिवाणसाहेबांच्या देखरेखीखालीं तो तलाव पूर्ण होण्यास मुळींच विलंब लागला नाहीं. काशीनाथाच्या आईच्या नांवानें प्रसिद्ध असलेला हा तलाव त्या सर्व प्रांतांत फार प्रेक्षणीय असा झाला आहे.

---

## ८. प्रामाणिकपणा.

बारिसालच्या रणांगणावर प्रसिद्धीस आलेले बाबू अंबिका चरण मुजुमदार, आणि कलकत्त्याच्या संस्कृत विद्यापीठाचे मुख्य अध्यापक बाबू कालीप्रसन्न भट्टाचार्य, हे विद्यार्थिदशेंत असतां एकदां हिंडावयास बाहेर गेले होते. त्यांस एक खेडवळ माणूस भेटला. त्यानें आपल्या डोक्यावर कातड्याची एक सुंदर ब्याग घेतली होती व मोठ्या लगबगीनें तो शहराकडे येत होता. ह्या दोघां विद्यार्थ्यांस पाहतांच तो थांबला, व म्हणाला, बाबूजी, ही ब्याग मला रस्त्यांत पडलेली दिसली. हिला कुलूप आहे. हींत पैसे व महत्त्वाचे कागदपत्र असावेत, असें मला वाटतें, कारण हे रुपये वाजताहेत पाहा ! असें म्हणून त्यानें ब्याग हालवून रुपये खुळखुळ वाजवून दाखविले. पुढें तो म्हणाला, ही जडही किती लागते आहे पाहा ! आतां माझी तुम्हांला एवढीच हात जोडून विनंती आहे, कीं ही ब्याग तुम्ही आपल्या जवळ ठेवून घेऊन तिच्या मालकाचा शोध लावा. माझ्याजवळ हें जोखीम नको. मी आपला गरीब माणूस ! शिवाय मालकाचा तपास कसा करावा हेंही माझ्यासारख्याला कळणें कठीण. तुम्ही थोर माणसें दिसतां. तुम्हांला हें काम सहज करितां येईल.

त्या दोघां विद्यार्थ्यांनीं त्या माणसाजवळची ब्याग घेतली, व मालकाचा शोध करण्याचें कबूल केलें. ठिकठिकाणीं जाहिराती देऊन व पोलिसांची मदत घेऊन त्यांनीं मालकाचा तपास लाविला. आपला ११००० रुपयांचा ऐवज व हजारों रुपयांच्या उलाढालींचे कागदपत्र जसेच्या तसे मिळालेले पाहून ब्यागेच्या मालकास अत्यानंद झाला. तो मालक मोठा व्यापारी होता. त्या खेडवळ माणसाला

ती ब्याग प्रथम सांपडली होती, त्याला आपण मोठें बक्षीस खुषीनें देऊं, असें त्यानें जाहीर केलें; पण त्या माणसाचा शोध कांहीं केल्या लागला नाहीं, आणि जरी लागता, तरी त्यानें तें बक्षीस घेऊन आपल्या प्रामाणिकपणाची किंमत रुपये, आणे, पैंत केली असती किंवा नाहीं, याची शंकाच होती !

बालवीरांच्या अंगीं असला प्रामाणिकपणा पाहिजे !

---

# ९. सहनशीलता.

चंद्रनगरांत शिशुबाबूंचें नांव माहीत नाहीं, असा मनुष्यच आढळणें कठीण. त्यांची ही प्रसिद्धि त्यांच्या वैभवामुळें त्यांस प्राप्त झाली नसून त्यांच्या सदय अंतःकरणामुळेंच ती त्यांस लाभली होती.

एके दिवशीं त्यांचा एक नौकर दिवाणखान्यांत दिवाबत्ती करीत असतां त्याचा धक्का लागून दिवाणखान्याच्या मध्यभागीं टांगलेलें एक फार मौल्यवान् झुंबर खळकन खालीं पडलें व त्याचा चक्काचूर झाला ! तो आवाज ऐकून शेजारींच कारभारी साहेब होते ते धावत आले व झालेला प्रकार पाहून त्यांनीं त्या नौकरावर यथेच्छ तोंडसुख तर घेतलेंच; पण तेवढयानें त्यांचें समाधान न होऊन त्यांनीं त्या बिचाऱ्याला लाथाबुक्क्या देण्यास आरंभ केला. बिचारा नौकर तर अन्यायीच होता. तो भीतीनें आधींच अर्धमेला झाला होता; त्यांत आणखी कारभारी साहेबांचे लत्ताप्रहार सुरू झाले ! तेव्हां तो धाय मोकलून रडूं लागला. त्याचा तो आर्तस्वर कानीं पडतांच शिशुबाबू धावतच तेथें आले. झालेला प्रकार त्यांना एका क्षणार्धांत कळून चुकला. खुद्द धनी साहेब आलेले पाहतांच कारभारी साहेब चपापून दूर झाले. शिशुबाबूंनीं पहिल्या प्रथम

त्या नौकरास कवटाळिलें. आपला कैवार घेण्यास आई आली असतां मूल जसें तिला बिलगतें, तशी अवस्था त्या नौकराची झाली. अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर शिशुबाबू कारभाऱ्यास उद्देशून म्हणाले, "तुमचें हें वर्तन मला बिलकूल पसंत नाहीं ! त्याच्या हातून काय असा गुन्हा घडला तें तरी सांगा पाहूं?' कारभाऱ्यानें फुटलेल्या झुंबराकडे बोट दाखविलें. "मग? ह्यानें हें झुंबर जाणून बुजून फोडिलें कीं काय?" शिशुबाबू नौकराचाच कड घेऊन म्हणाले, "चुकून एकादे वेळीं अशा गोष्टी व्हावयाच्याच. आपल्याकडून मोठी नुकसानी झाली, ही गोष्ट ह्या नौकराला सुद्धां कळते; असें असतां तुम्हीं लाथाबुक्क्यांशीं गांठ घातलीत, हें अगदीं गैरशिस्त आहे."

नौकरांविषयीं इतकी पराकाष्ठेची सहानुभूति बाळगणाऱ्या धन्याचे त्याच्या नौकरांनीं धन्यवाद गाइले, तर त्यांत आश्चर्य कसलें?

---

## १०. समाधानवृत्ति.

प्रख्यात कवि द्विजेंद्रलाल राय यांचे वडील कार्तिकचंद्र राय हे कृष्णनगरच्या महाराजांच्या पदरीं दिवाण म्हणून होते. त्या वेळीं त्या संस्थानाची बरीच ओढघस्तीची स्थिति असल्यामुळें महाराजांकडून ह्या दिवाणांना महिन्याचे फक्त १०० रुपये मिळत. कार्तिकचंद्र हे फार लायक व कर्तव्यनिष्ठ सेवक असल्यामुळें त्यांचा लौकिक इंग्रजसरकारच्या कानीं जाऊन त्यांस सरकारनें ३०० रुपयांची नौकरी देऊं केली, परंतु कार्तिकचंद्रांनीं ती स्वीकारिली नाहीं. पुढें सरकारनें त्यांस ५०० रुपये देऊं केले, परंतु कार्तिकचंद्रांची नजर द्रव्यावर मुळींच नसे, यामुळें त्यांनीं ही नौकरी सुद्धां वांया दवडिली.

हें पाहून त्यांच्या स्नेह्यासोबत्यांस मोठा आचंबा वाटला. व त्यांच्या एका जिवलग स्नेह्यानें तर ह्या त्यांच्या कृत्यावर अविचाराचा छाप मारिला, तेव्हां कार्तिकचंद्र म्हणाले, "बाबारे, माझ्या नौकरीची आपल्या महाराजांना फार आवश्यकता आहे. आतां, माझा तनखा वाढविण्यास त्यांस सामर्थ्य नाहीं, हा काय त्यांचा दोष? त्यांच्या हातांत आहे तेवढें ते मजकरितां केव्हांही करण्यास सिद्ध असतात; ते मला ममतेनें व सन्मानानें वागवितात, हें मी कसें विसरूं? शिवाय मीही आतां इतक्याच पैशांत निर्वाह करण्यास शिकलों आहें, मग मला अधिक पैसा तरी कशाला हवा?"

तुपाच्या लालुचीनें उष्टें खाण्यास हपापलेल्या लोचट माणसांनीं कार्तिकचंद्रांची ही समाधानवृत्ति आंगीं बाणविली, तर पदोपदीं अपमान सहन करण्याचे किती तरी प्रसंग त्यांस टाळितां येण्यासारखे आहेत.

---

## ११. कृतज्ञता.

—:o:—

बंगाल्यांतील रेलवेकडील एक बडा अधिकारी इंग्लंडास परत गेल्यावर एकदां आपल्या स्नेह्याशीं इकडील लोकांच्या चांगुलपणाविषयीं गप्पा मारूं लागला, तेव्हां त्याचा मित्र म्हणाला, "एकूण बंगाली लोकांनीं अलीकडे आपली वर्तणूक पुष्कळच सुधारिली म्हणावयाची! कारण आपले मेकाले साहेब तर त्या बंगाल्यांच्या नांवानें खडे फोडीत असत!" यावर तो अधिकारी म्हणाला, "मेकाले साहेबानें एक चूक केली, ती ही, कीं त्यानें कोठले चपराशी, कोठले खिजमतगार, असल्या हलक्या नौकरांच्या स्वभावांचें निरीक्षण करून त्यावरून सरसकट सगळ्याच बंगाल्यांना दोष

लाविला !" सरते शेवटीं बंगाली तरुण किती कृतज्ञ असतात हें आपल्या मित्राच्या नजरेस आणण्यासाठीं त्यानें एक युक्ति करण्याचें ठरविलें. तो इकडे कामावर असतांना त्यानें एका रामगति मुकर्जी नांवाच्या उमेदवारास नौकरीस लावून दिलें होतें, व तो पुढें दहा वर्षें-पर्यंत आपल्या कर्तबगारीनें बऱ्याच मोठ्या हुद्यापर्यंत चढला होता. या गृहस्थास त्यानें एक पत्र पाठवून कळविलें, कीं " मी एथें आल्यावर एका धंद्यांत सर्वस्वीं बुडालों असून तूर्त तर उद्यांच्या विवंचनेंत आहें. अशा स्थितींत आपण कांहीं मदत कराल तर फार उपकार होतील." ह्या पत्राचें उत्तर काय येतें ह्याची ते वाट पाहात बसले. रामगति बाबूंकडून उलट टपालीं पत्राचें उत्तर गेलें, हें सांगावयास नकोच. त्यांतील आशय असा होता—

" साहेब, आपलें पत्र पावलें. आपणांवर ओढवलेल्या प्रसंगाची हकीगत वाचून फार खेद वाटला. अजूनहीं आपली ही ग्रह-दशा पालटेल व आपणांस सुस्थिति प्राप्त होईल, अशी मला आशा आहे. दरम्यान, ह्या पत्रासोबत पाठविलेल्या रकमेचा स्वीकार व्हावा. माझा पगारच इतका असल्यामुळें याहून अधिक कांहीं पाठवितां आलें नाहीं, याबद्दल खेद वाटतो. यापुढेंही महिन्याच्या महिन्यास माझा अर्धा पगार आपल्याच हक्काचा आहे असें समजून स्वीकार करीत असावें. माझ्या मनांत आपणांविषयीं बसत असलेली कृतज्ञता व्यक्त करण्याची संधि मला इतक्या लवकर मिळाली, हें पाहून मला एक प्रकारें आनंद वाटत आहे.—पण हें लिहिणें कसें-सेंच वाटतें—असो. मला वाईट वाटतें तें इतकेंच, कीं मला याहून आपल्या अधिक उपयोगीं पडण्याची ऐपत नाहीं."

तात्पर्य, कृतज्ञता ही चीज कोणा एका विशिष्ट देशांतील लोकांच्याच तेवढी मालकीची आहे असें नव्हे; परंतु, ती सर्वच माण

सांच्या वांट्यास आलेली नसते, एवढें मात्र खास. कृतज्ञतेला महत्त्व येतें तें यामुळेंच.

---

# १२. सत्यनिष्ठा.

एका मुलानें एकदां आगगाडीचा प्रवास करण्यासाठीं सिलदा स्टेशनापासून तों बेलघेरियापर्यंतचें जातां येतांचें ( रिटर्न ) टिकीट काढिलें; पण तो चुकून भलत्याच गाडींत बसल्यामुळें त्याला बेलघोरियाच्या पुढें तीन स्टेशनें टाकून टिटाघर एथें उतरावें लागलें, कारण ती गाडी दरम्यान कोठें थांबणारी नव्हती. टिटाघरच्या टिटिक-कलेक्टरानें त्याजपाशीं जादा भाडें मागितलें, व तें त्यानें दिलें. त्याच्या जवळचे सर्व पैसे संपले, व बेलघोरियास परत जाण्यास त्याजवळ पैसा राहिला नाहीं. त्या मुलाची फसगत झालेली टिकिट-कलेक्टरास उघड दिसत असल्यामुळें त्यानें त्याला थोडक्या पैशांत बेलघोरियास परत जाण्याची नामी युक्ति सुचविली. तो म्हणाला, तूं एथून बेलघोरियापर्यंतचें टिकिट न काढितां तसाच परत जाणाऱ्या गाडींत बैस. पुढलें टिकिट तुजजवळ आहेच. पलीकडे गाडीही तयारच आहे, वाटेंत कोणी टिकिटें तपाशीत नाहींत. जाऊन बैस जा. त्यावर तो मुलगा म्हणाला, साहेब, आपण म्हणतां तशी ठकबाजी माझ्या हातून कधींही होणें नाहीं. आपल्याला मजवर उपकारच करावेसे वाटत असले, तर मला बेलघोरियाचें टिकिट काढण्यास आठ आणे उसने द्या. मी घरीं जातांच तुमचे पैसे परत करीन. नाहीं तर मला बेलघोरियापर्यंत पायीं जाणें पुरवेल. त्या टिकिट-कलेक्टराला त्या पोराचा फार राग आला, व तो म्हणाला, ज्याचें करावें बरें, तो म्हणतो माझेंच खरें! तुझ्या पायांना रग आली

असली तर खुशाल पायीं जाईनास; माझें थोडेंच गाठोडें बुडणार आहे! शिवाय तूं गाडींत बसला नाहींस, म्हणजे इंजनाला गाडी ओढायला तेवढेंच हलकें पडेल असें थोडेंच आहे. खुशाल पायीं जा.

त्या मुलानें उपहासाची परवा न करितां तडक बेलघोरियाची वाट धरिली. रात्र काळोखी, वाटेनें चिटपांखरूंही नाहीं, अशा स्थितींत त्या भयाण किर रानांतून मार्ग आक्रमीत त्यानें बेलघोरिया स्टेशन गांठलें! आपल्याला त्या वेळीं भीति कशी वाटली नाहीं याचें, मागाहून त्याचें त्यालाच आश्चर्य वाटूं लागलें; पण ह्यांत आश्चर्य कसलें? पापभीरु माणूस पापाला भीत असला, तरी संकटांशीं तो कर्दनकाळाप्रमाणें धैर्यानें झुंजतो, व त्याच्या चर्मचक्षूंपुढें काळा कुट्ट अंधार पसरलेला असला, तरी सत्याची तेजस्वी ज्योत त्यास सदा सर्वकाळ मार्गदर्शक होते.

मुंबईस गुदस्त सालीं एका मोठ्या स्टेशनावर गाडींतील उतारूंची टिकिटें तपासण्यांत आलीं. त्या वेळीं हजारों माणसें बिनटिकिटानें प्रवास करीत असल्याचें आढळून आलें! त्या माणसांत पुरुष होते, स्त्रिया होत्या; मुलगे होते, मुली होत्या; तरुण होते, म्हातारे कोतारे होते; श्रीमंत होते, गरीब होते; मग नव्हते कोण? — सच्चे लोक!

---

## १३. औदार्य.



प्रसिद्ध बंगाली कवि राजकृष्ण राय ह्यांच्या इतकी ग्रंथरचना करणारा बंगाली लेखकांत क्वचितच कोणी आढळेल. ते कवि, नाटककार, निबंधलेखक, भाषांतरकार असे अष्टपैलू गृहस्थ होते. त्यांना 'बंगालचा साउदे' म्हणतात तें अगदीं यथार्थ होय. त्यांच्या बिल-

क्षण औदार्याची अशी गोष्ट सांगतात, कीं एका नाटक मंडळीच्या व्यवहारांत त्यांस इतकी जबर ठोकर बसली, कीं त्यांस दुपारची देखील भ्रांत पडूं लागली. एके दिवशीं तर बाबू गोविंददास चतर्जी नांवाच्या एका प्रकाशकाजवळ हात पसरून एक दिवसाच्या खर्चा-पुरते दोनतीन रुपये मागण्याशिवाय त्यांस गत्यंतरच उरलें नाहीं, व त्या भल्या माणसानेंही ह्यांची योग्यता ओळखून तावडतोब पैसे दिले. हे रुपये खिशांत टाकून स्वारी मोठ्या आनंदानें दुकानाच्या बाहेर पडते, तोंच त्यांचा एक जुना दोस्त त्यांस भेटला, व आपली करुण कहाणी त्यांस सांगूं लागला. काय करावें? तिकडे बायको तर फार अजारी म्हणून पत्र आलें आहे; आणि खिशांत तर चार दिड-क्याही नाहींत. कोणाजवळून दोनतीन रुपये उसने काढावे, तर ह्या परक्या गांवांत आपली ओळख ना देख, मग आपल्याला पैसे देणार कोण? ह्या राजेश्रीच्या खिशांत दोनतीन रुपये खुळखुळत होतेच! त्यांनीं तावडतोब खिशांत हात घातला, व पुढचा मागचा कांहीं एक विचार न करितां त्या आपल्या दोस्तास सगळे पैसे देऊन टाकून वाटेस लाविलें! त्या बिचाऱ्या मित्राला काय माहीत, कीं ह्यांच्या औदार्याचा फायदा घेतल्यास ह्यांना एकादशी करण्याची पाळी येणार हें? तो पैसे घेऊन निघून गेला; पण मागाहून ही सर्व हकीकत कळल्यावर त्यासही फार ओशाळल्यासारखें झालें असेल ह्यांत शंका नाहीं.

---

## १४. नीतिधैर्य.

बंगाल प्रांतांत कृष्णदास पाल ह्या नांवाचे एक प्रसिद्ध गृहस्थ राहात होते. कसलेला लेखक, चतुर मुत्सद्दी व कळकळीचा देश-

भक्त, अशी त्यांची फार ख्याति होती. स्वातंत्र्याचा भोक्ता व नीति-धैर्याचा पुतळा ह्या दृष्टींनींही ते फार प्रसिद्ध होते. त्यांची किर्ति व दर्जा इतका मोठा असल्यामुळें इंग्रज व एतद्देशीय बडे बडे लोक त्यांस भेटण्यासाठीं वारंवार त्यांच्या घरीं जात, तरी पण त्यांची राहाणी फारच साधी व गरीबीची असे. त्यांच्या वडिलांस आधुनिक सुधारणांचें वारेंही नव्हतें, यामुळें ते अगदींच खेडवळ माणसा-सारखे दिसत. त्यांचा थाट पाहून कृष्णदास पाल ह्या विख्यात गृह-स्थांचे हे वडील, असें सांगून सुद्धां कोणाला खरें वाटलें नसतें.

एके दिवशीं एक बडा इंग्रज अधिकारी घोड्यावर बसून कृष्ण-दासांच्या भेटीसाठीं आला. तो कामदार दाराशीं येतांच एक पंचा नेसलेला म्हातारा इसम चटकन पुढें झाला. साहेबांनीं मोठ्या ऐटींत त्याच्या हातांत लगाम देऊन खालीं उतरून कृष्णदास बाबू कोठें आहेत म्हणून चौकशी केली. कृष्णदास आंत होतेच. ते एकदम पुढें झाले, व त्या म्हाताऱ्याच्या हातांतील लगाम मोठ्या अदबीनें आपल्या हातांत घेऊन साहेबांस म्हणाले, हे माझे तीर्थरूप! साहेब बहादुरांची स्वारी फारच खजिल झाली. काय! तीर्थरूप? ज्याला आपण यःकश्चित् नोकर समजून घोड्याचा लगाम धरून उभें राहाण्यास लाविलें, ते कृष्णदास बाबूंचे तीर्थरूप? त्याला कृष्ण-दास बाबूंची व त्यांच्या पूज्य वडिलांची क्षमा मागतांना पुरे वाट झाली!

बाबा! आतां माझ्याकडे ते सोनोपंत, आणखी ते गुलाबराव बिझिक खेळायला यायचे आहेत. तुम्ही आपलें हें चंबूगबाळें आटोपून तिकडे मागल्या माडींत जाऊन बसा! त्यांच्यासमोर तुमचें हें प्रदर्शन नको. अशा रीतीनें आपल्या वृद्ध मातापितराची संभावना करणाऱ्या आधुनिक इष्कीबाज तरुणांनीं कृष्णदास बाबूंच्या ह्या नीति-धैर्याची गोष्ट पुन्हा पुन्हा वाचावी, पुन्हा पुन्हा मनन करावी,

म्हणजे थोरांची वागणूक किती थोरपणाची असते, हें त्यांच्या ध्यानीं येऊन त्यांच्या उन्मत्तपणाचा पारा थोडा तरी खालीं उतरेल.

---

## १५. शिष्टाचार.

बंगालमधील एक शालाधिकारी बाबू भूदेव मुकर्जी हे एकदां ओरिसा प्रांतांत शाळा तपासण्यास गेले असतां त्यांना असें कळलें, कीं ओरिसाचे राजेसाहेब हे आपला दर्जा व कुलशील ह्यांचा कांहीं-एक विचार न करितां ज्याच्या त्याच्या पुढें पुढं करून लाळघोटेपणा दाखवितात. यःकश्चित् मामलेदारासारखा छोटासा कामगार त्यांच्या भेटीस आला, तरी सुद्धां ते आपला राजेपणा विसरून त्याच्या गाडीचा दरवाजा उघडण्यास धावत, त्याच्या पुढें पुढें करीत, त्याला स्वतः पंख्यानें वारा घालीत ! ह्या त्यांच्या हांजी करण्याच्या गुणामुळें आजूबाजूच्या लोकांस त्यांचा अगदीं तिटकारा येत असे. भूदेवबाबूंची स्वारी राजवाड्याजवळ जाते, तों राजेसाहेब त्यांची मार्गप्रतीक्षा करीत उभेच होते ! त्यांनीं चटकन पुढें होऊन भूदेवबाबूंस पालखींतून खालीं उतरून घेतलें, व सुहास्यवदनानें त्यांचें स्वागत करून चपराशाप्रमाणें त्यांच्या मागोमाग जात जात त्यांस आपल्या महालांत नेलें, व स्वतः पंख्यानें वारा घालण्यास प्रारंभ केला !

राजेसाहेबांचें हें वर्तन पाहून भूदेवबाबूंची पक्की खातरी झाली, कीं त्यांच्या कृतींत लाळघोटेपणाचें तत्त्व नसून पूर्वापार चालत आलेली अतिथिसत्काराची शास्त्रोक्त रीत त्यांच्या हाडींमासीं पूर्णपणें खिळूनच गेली होती. वर वर पाहणाराला मात्र हा हांजीहांजीपणा वाटे. एथें वास्तविक विचार करितां भूदेवबाबूंसारखा बिचारा शालाधिकारी राजेसाहेबांचें काय वांकडें करणार होता ! असें असून सुद्धां

त्यांनीं भूदेवबाबूंस मामलेदारा इतक्याच इतमामानें वागविलें.

राजेसाहेबांच्या घरीं आलेला गृहस्थ—मग तो अधिकारी असो, वा अनधिकारी असो, त्याचें आदरातिथ्य सारख्याच थाटानें होतें, हें जेव्हां लोकांच्या नजरेस येऊं लागलें, तेव्हां त्यांना राजेसाहेबांच्या थोर अंत:करणाचा ठाव लागला, व त्यांच्या शिष्टाचाराची ख्याति चोहोंकडे पसरली.

---

## १६. जीवास जीव देणें.

कटक प्रांतांतल्या एका लहानशा खेड्यांतली गोष्ट. तेथें एक गरीब कुटुंबवत्सल ब्राह्मण आपलीं मुलेंबाळें घेऊन आनंदानें कालक्रमणा करीत असे; पण १८६६ सालीं जो दुष्काळानें कहर केला, त्यांत ब्राह्मणाच्या तोंडचें पाणीच पळालें. सुगीच्या दिवसांत सुद्धां बिचाऱ्याला मीठभाकर मोठ्या कष्टानें मिळत असे. वडिलार्जित जमिनीचा तुकडा घरच्या घरींच कसून जें काय उत्पन्न होईल त्यांत ब्राह्मणाची समाधानवृत्ति असे; परंतु लागोपाठ दुष्काळांमागून दुष्काळ पडूं लागले, तेव्हां तो तरी बिचारा काय करितो ? जमिनीचें उत्पन्न पहिल्या महिन्यांतच खलास झालें. घरची बैलजोडी मातीमोलानें विकून आणखी एक महिन्याचा गुजारा झाला. पोटच्या पोरांप्रमाणें वाढविलेल्या गाईम्हशी मोठ्या मिनतवारीनें दुसऱ्याच्या गळ्यांत बांधून,—कारण ज्याची त्याला दुपारची भ्रांत पडलेली; तो गाईम्हशींचीं खिल्लारें कशाला विकत घेत बसतो !—आणखी दोन महिने कसेबसे पार पडले. ब्राह्मणानें व त्याच्या बायकोनें एक वेळच जेवावें, दोघां मुलांस मात्र दोन्ही वेळां पोटभर जेऊं घालावें, असा क्रम ठेऊन सुद्धां फार दिवस निभाव लागे ना. दिवसेंदिवस दुष्का-

ळाचें स्वरूपही उग्रतर होत चाललें. पैसे देऊन सुद्धां बाजारांत धान्य मिळे ना ! घरांतलें भांडेंकुंडें एक एक विकून जे काय चारआठ आणे येतील. त्यांचें लांबून कोठून तरी मूठपसा धान्य आणावें व सर्वांनीं जेमतेम जीव जगण्यापुरतें खावें, असा क्रमही कांहीं दिवस चालला. पुढें विकण्याजोगेंही घरांत कांहीं राहिलें नाहीं, आणि जरी कांहीं असतें तरी तें विकत घेत बसतो कोण ? आतां भिक्षापात्र अवलंबण्याशिवाय दुसरा मार्गच उरला नाहीं, व हजारों माणसांनीं त्याचा अवलंबही केला होता; परंतु ह्या मानी ब्राह्मणाला तो मार्ग पसंत पडे ना. जरी त्यानें तो पतकरला असता तरी एवढ्या भिक्षेकऱ्यांना धर्म करणार कोण ? त्या काळीं हल्लींसारखीं दुष्काळी कामेंही निघत नसत. इंग्रजींत एक म्हण आहे तीप्रमाणें टक्के देऊन अगर याचना करून धान्य मिळविण्याचा मार्ग खुंटल्यावर पुष्कळशा आडदांड लोकांनीं चोऱ्यामाऱ्या व लुटालूट करून उपजीविका करण्यास आरंभ केला होता; पण ह्या सात्त्विक वृत्तीच्या ब्राह्मणाला तोही मार्ग पटे ना. आतां भूमातेच्या अंकावर लोळण घेऊन कंदमुळें, झाडपाला वगैरे जें मिळेल तें खावें, कधीं पोटभर. तर कधीं अर्धपोटीं, तर कधीं अजिबात उपाशींच, अशा अवस्थेंत प्राण व कुडी ह्यांची सांगड किती दिवस टिकणार ? बिचाऱ्या ब्राह्मणानें एके दिवशीं इहलोकची कष्टमय यात्रा संपविली, व दोन पोरांस पोसण्याचा भार एकट्या बिचाऱ्या अबलेवर पडला. नवऱ्यास कष्ट होऊं नयेत म्हणून त्या माउलीनें आजवर आपले स्वताचे क्लेश निमूटपणें सोसले; पण आतां तीही अंथरुणास खिळली, व घटकेची सोबती दिसूं लागली. ब्राह्मणाचा मोठा मुलगा सनातन हा अवघा १२ वर्षांचा असून धाकटा कृष्ण हा सारा ८ वर्षांचा होता, त्यामुळें आईची शुश्रूषा करणें, भावास संभाळणें व दुपाराकारितां झाडपाला गोळा करणें हें सर्व बिचाऱ्या बारा वर्षांच्या सनातनाला करण्याची पाळी आली. त्यानें

सारा दिवस वणवण हिंडावें, व जें काय मिळेल तें बहुतेक आईला व भावांस देऊन आपण उपाशींच राहावें, व त्यांनीं विचारिल्यास आपण खाल्लें, असें खोटेंच सांगून वेळ मारून न्यावी, असा क्रमही कांहीं दिवस चालला. सनातनचा बेत असा, कीं आपलें कांहींही होवो, आपल्या जीवांत जीव असे पर्यंत आईला व भावाला कमी पडूं द्यावयाचें नाहीं. ज्या दिवशीं घासभर अन्न पोटांत जाई, त्या दिवशीं त्याच्या आईला किंचित् हुशारी वाटे; पण घासभर भातही पोटांत गेला नाहीं, तर तिला डोळेही उघडवत नसत, इतकी तिची अवस्था झाली होती.

एके दिवशीं सनातन सकाळींच घरांतून बाहेर पडला. आधींचा दोन दिवसांचा कडकडीत उपवास घडल्यामुळें त्यास धड चालण्याचीही ताकद उरली नव्हती, म्हणून तो क्षणभर एका ब्राह्मणाच्या घराजवळ टेकला. त्याला पाहून ब्राह्मणास कींव आली, व त्यानें घरांतून थोडासा शिळा भात आणून सनातनच्या पदरांत टाकिला.

दोन दिवसांच्या उपवासानंतर मिळालेलें अन्न! अन्नावांचून प्राण कासावीस होत असतां मिळालेलें अन्न! अन्नमय प्राण म्हणून ज्याची थोरवी गातात, तें अन्न!—असें अन्न सुदैवानें अचानक लाभलें, हें पाहून सनातनला हर्षातिरेक घाला, पण तो कां? ह्या अन्नाचा घास आईच्या तोंडांत घालून आपण आजचा दिवस तरी तिचे प्राण वांचविणार म्हणून! त्याच्या तोंडाला पाणी सुटलें नाहीं. त्यानें त्या अन्नाचें शीतही चाखिलें नाहीं! मिळालेल्या अन्नाची पुरचुंडी घेऊन तो धावत घराकडे निघाला. पण....हाय! हाय!! त्याचे पाय एकमेकांत घुटमळले. तो खालीं पडला. त्याची प्राणज्योत निमाली. त्यानें आपल्या आईच्या व धाकट्या भावाच्या जीवास जीव दिला!

---

# १७. माणुसकी.



हुगळी स्टेशनावरील एक गोष्ट. दिवस ऐन उन्हाळ्याचे असून उतारू बसण्याच्या जागेंत चिकार गर्दी झालेली होती. जरा उंच मोकळ्यावर बसूं म्हटलें, तर बांकें अवघीं तीनच असून तीं तिन्ही उतारूंनीं आडविलेलीं होतीं. ज्या बिचाऱ्यांना बांक मिळवितां आलें नव्हतें ते लोक कोणी उभे तर कोणी जमिनीवरच घाणींत बसून हुश्श हुश्श करीत बसले होते. इतक्यांत एक म्हातारे बुवा कांठी टेकीत टेकीत व घामानें निथळत तेथें आले, व पाठुंगळीस मारिलेलें भलें जंगी गाठोडें कोठें तरी स्वच्छ जागीं टेकावें म्हणून आजूबाजूस पाहूं लागले. गर्दीतून वाट काढीत काढीत ते कसेबसे पहिल्या बांकाशीं आले. तें बांक सहासात माणसांस बसण्यास पुरेल इतकें मोठें असून दोनतीन आडदांड पोरांनींच बळकाविलें होतें. म्हातारे-बोवा जवळ आलेसे पाहून तीं पोरें फिदी फिदी हसूं लागलीं, व त्यास जागा करून देण्याच्याऐवजीं त्याचा उपहास करीत सुटलीं. तो म्हातारा तेथें क्षणभरही न थांबतां दुसऱ्या बांकाकडे वळला. तेथेंही एकाद्या माणसानें आपल्या तंगड्या थोड्या आखडून घेतल्या असत्या तर त्या म्हाताऱ्यास पुरेशी जागा सहज झाली असती, पण त्याच्याकडे आपलें लक्षच नाहीं अशा बेफिकीर वृत्तीनें तीं माणसें वागूं लागलीं. म्हातारेबोवा तिसऱ्या बांकाकडे वळले. एथें जागा मुळींच नव्हती, परंतु तो म्हातारा गृहस्थ जवळ येत असलेला पाहातांच एक तरुण मुलगा कांहीं काम असल्याचा बहाणा करून तेथून उठला, व म्हातारेबोवांस तेथें बसण्यास जागा मिळाली. त्या तरुण मुलाचें एवढ्यानेंच समाधान झालें नाहीं. तो वारा घेण्याच्या मिषानें आपल्या हातांतील वर्तमान पत्रानें अशा रीतीनें वारा घेऊं

लागला, कीं त्याचा वारा सगळा त्या म्हाताऱ्यासच लागावा!

हा सर्व प्रकार एक युरोपियन गृहस्थ आडून, पण बारकाईनें, पाहात होता. त्या मुलाची माणुसकीची रीत पाहून त्यास मोठी मौज वाटली, परंतु एक गोष्ट समजावून घेण्याची मात्र त्यास फार उत्कट इच्छा उत्पन्न झाली. हा म्हातारा त्या मुलाच्या ओळखीचा कोणी आहे किंवा कसें हें समजावून घेतल्याशिवाय त्यास चैन पडे ना. त्या मुलाची व म्हाताऱ्याची आधींची ओळख असली, तर त्या मुलानें वर्तन केलें तें योग्यच केलें; परंतु जर त्यांची पूर्वीची कांहींच ओळख नसली, तर त्या मुलाची भलेपणाची वागणूक विशेषच लक्षांत ठेवण्यासारखी होय असें त्यास वाटलें. तो युरोपियन गृहस्थ एक मोठा अधिकारी असल्यामुळें त्याजबरोबर एक बंगाली कारकून होताच. त्यास ह्या कामगिरीवर पाठवून त्याच्यामार्फत युक्ति-प्रयुक्तीनें हा खुलासा काढून आणण्याची व त्या मुलाचें नांव, गांव वगैरेचाही खुलासा काढण्याची त्यानें युक्ति योजिली; आणि ती चांगली फलद्रूपही झाली.

त्या मुलाचें नांव सतीशचंद्र बानर्जी असें असून तो एक विद्वान् पदवीधर होता; त्यानें त्या म्हाताऱ्याला ह्यापूर्वीं कधीं पाहिलें सुद्धां नव्हतें! सतीशाचें नांव त्या साहेबाच्या चांगलेंच स्मरणांत राहिलें. सतीशाला कारकुनाची खुबी कळून येण्यास मात्र मार्ग नव्हता; कारण, आपण कोठले, काय, कोठें जाणार? असले प्रश्न आपल्या शेजारच्या उतारूस आपण किती तरी वेळां निष्कारण विचारीत असतोंच.

ह्यानंतर कांहीं महिन्यांनीं सतीशानें एका मोठ्या नौकरीकरितां अर्ज केला, व कर्मधर्मसंयोगानें त्याच्या अर्जाचा निकाल करण्याचें काम त्याच युरोपियन अधिकाऱ्याकडे होतें. सतीशाच्या सहीचा अर्ज पाहतांच त्या गृहस्थाला पूर्वीं स्टेशनावर घडलेल्या प्रसंगाचें

स्मरण झालें व इतर सर्व अर्ज बाजूस सारून ह्या माणुसकी असलेल्या सतीशाचीच त्यानें निवड केली; कारण माणसांचा स्वभाव बारीक सारीक वाटणाऱ्या गोष्टींत जसा दिसतो तसाच तो मोठमोठ्या महत्त्वाच्या कामांतही दिसून यावयाचा.

---

## १८. धाडस.

मुर्शिदाबाद जिल्ह्यांत हतहबीबपूर हें एक बरेंच मोठें गांव असून तेथें बाबू कालीचरण घोष ह्या नांवाचे एक घरंदाज गृहस्थ राहात असत. त्यांचा गोतवळा एवढा मोठा होता, कीं त्यांस राहण्यास त्या गांवांत दहाबारा घरें लागत असत. एके दिवशीं रात्रीच्या वेळीं एका घरांत आकस्मिक रीतीनें आग भडकली, व घराचें छप्पर गवताचें असल्यामुळें आगीचा डोंब सभोंवार पसरला. आग लागली म्हणजे तेथें जोराचा वाराही उत्पन्न होऊन आगीस मदत करितो. अपरात्रीची वेळ असल्यामुळें आग हा शब्द कानीं पडतांच जिकडे तिकडे हाहा:कार उडाला, शेजारी पाजारी गोळा होऊन ताबडतोब आग विझविण्याच्या व मुलांमाणसांस आगींतून सुरक्षित बाहेर काढण्याच्या उद्योगाला लागले. पाणी जरी दूर होतें, तरी सगळा गांव आग विझविण्यास घसरल्यामुळें आग कह्यांत येईल असें दिसूं लागलें. इतक्यांत एक बाई ओक्साबोक्शीं रडत तेथें आली, व माझ्या बाळा रे ! म्हणून हंबरडा फोडूं लागली. घरांतून धांदलीनें बाहेर पडतांना मुलास उचलून आणण्याचें तिला भानच राहिलें नव्हतें, व आतां मूल जिवंत हातीं लागण्याची आशाच खुंटल्यामुळें तें आईचें अंतःकरण विदीर्ण होऊं लागलें. तें मूल ज्या घरांत राहिलें होतें, तें त्यांतल्या त्यांत मोठें असल्यामुळें अद्याप दुसऱ्या मजल्यास आग

पोहोंचली नव्हती; पण सभोंवार सर्व घरें धडाडून पेटलेलीं, ह्यामुळें त्या होमकुंडांत ह्या घराची आहुती पडण्यास फारसा अवधि उरला नव्हता. निराशेनें माणसास अवसान चढतें. त्यांत आणखी मातेच्या वात्सल्याची भर पडून ती बाई मुलास वांचविण्यासाठीं स्वतः आगींत घुसूं लागली; पण आजूबाजूच्या लोकांनीं मोठ्या शर्थीनें तिला ह्या साहसापासून परावृत्त केलें. तेवढ्या त्या घोळक्यांत असा एकही हिंमतबहाद्दर कोणी निघे ना, कीं जो त्या आगींत उडी घालून मायलेकरांची पुन्हा भेट करूं शकेल. सर्व जण चित्राप्रमाणें तटस्थ होऊन त्या आगीकडे, त्या घराकडे व शोकरसांत गटंगळ्या खाणाऱ्या त्या दीन अबलेकडे पाहात स्वस्थ उभे राहिले.

त्या घोळक्यांत एक रामगोपाळ दे नांवाचा मुलगा उभा होता. हा मुलगा दिसण्यांत फार कुरूप असल्यामुळें त्याचे सवंगडी त्याच्या फार पाठीस लागत, व त्याच्या चेष्टा करीत. रामगोपाळाला आतां स्वस्थ बसवे ना. त्यानें शेजाऱ्याच्या हातांतील पाण्याची बादली हिसकावून घेऊन आपल्या डोक्यावर ओतली व नखशिखांत चिंब भिजल्यावर हातांत आणखी एक बादली घेऊन आगीकडे धूम ठोकिली. त्यानें असलें साहस करूं नये म्हणून पुष्कळांनीं त्याची समजूत घातली, परंतु त्यानें एकदां निश्चय केला तो कायमच. त्यानें असें पाहिलें, कीं मूल घराच्या ज्या भागांत निजलें होतें तो भाग अद्याप बिनधोक होता; फक्त तेथें जाण्याच्या वाटेवर आगीचा डोंब पसरला होता.

रामगोपाळला त्या घरांतील खोल्या, जिने वगैरेंची खडानखडा माहिती होती. त्यानें आपले कपडे ओले करून घेतले होते; तरी पण आगीच्या धगीनें ते तेव्हांच सुकून गेले. धुरामुळें त्यास पुढचें कांहींच दिसे ना; तरी पण तें मूल आंत जागें होऊन टाहो फोडीत असल्यामुळें त्यास नेमकें त्याच्या पाळण्याजवळ जातां आलें.

त्यानें मुलाला कपड्यांत गुंडाळिलें, हातांतील पाण्याची बादली मुलाच्या व आपल्या अंगावर ओतून घेतली, आणि पुन्हा तो तीरासारखा त्या घरांतून बाहेर पडला.

रामगोपाळनें घरांतून बाहेर पाऊल ठेविलें, आणि दुसऱ्याच क्षणीं तें सबंध घर धडाडा खालीं कोसळलें! एक क्षणाचा विलंब लागता, तर रामगोपाळाचें आणि त्या मुलाचें एक नखही पुन्हा कोणाच्या दृष्टीस पडण्याचा संभव नव्हता !

इतक्या धोक्यांत जीव घालून त्या बालकाची आगींतून सुखरूपपणें सुटका केल्याबद्दल धाडशी रामगोपाळच्या नांवाचा प्रचंड जयघोष सुरू झाला, पण आपलें मूल सुरक्षितपणें पुन्हा आपल्या हवालीं करणाऱ्या रामगोपाळाचे आभार मानण्यास त्या बाईच्या तोंडांतून शब्दच बाहेर पडे ना. तिनें सद्गदित अंतःकरणानें आपल्या त्या उपकारकर्त्याकडे एक वार पाहिलें मात्र. लोकांच्या दृष्टीला कुरूप दिसणारा रामगोपाळ त्या बाईला स्वर्गीय देवदूतासारखा वाटला असेल नाहीं बरें ?

---

## १९. इमान.

कलकत्त्याचे प्रसिद्ध व्यापारी मदनमोहन दत्त ह्यांच्या पदरीं रामदूलाल नांवाचा एक मुलगा उधारी वसूल करण्याच्या कामावर होता. त्याला धन्याकडून महिन्याचे फक्त पांच रुपये मिळत, पण तेवढ्यावरच संतुष्ट राहून रामदूलाल आपलें काम चोख रीतीनें बजावीत असल्यामुळें त्यानें धन्याची मर्जी लवकरच संपादन केली. एकदां उधारी वसूल करून परत येत असतां त्याला वाटेनें रात्र झाली, जवळ ऐवज पुष्कळ, आणि वाटेनें चोरांची भीति. बरें, एकाद्याच्या

घरीं जाऊन पांथस्थ म्हणून उतरावें, तर, न जाणो, कदाचित् तो मालकच लुबाडावयाचा, अशा पेचांत सांपडल्यावर रामदूलालला एक युक्ति सुचली. त्यानें आपल्या जवळचा ऐवज एका झाडाखालीं पाचोळ्यांत लपवून ठेविला व आंगाला राखाडी फासून बैराग्याच्या वेशानें तेथें जवळच धुमी पेटवून सारी रात्र जागून काढिली, व पहांट होतांच पुन्हा प्रवासास सुरुवात केली. रामदूलाल रात्रीं परत न आल्यामुळें त्याचा धनी काळजींतच होता, परंतु दुसऱ्या दिवशीं रामदूलालच्या समयसूचकतेची हकीगत ऐकल्यावर त्याला मोठें आश्चर्य वाटलें, व त्यानें रामदूलालचा पगार एकदम पन्नास रुपये केला ! वारसीगड़ा भाई

आतां रामदूलालचा दर्जा बराच वाढला, त्याचा धनी त्याला बंदरावर आयात निर्गत मालाची जहाजांतून चढउतर करण्याच्या कामावर पाठवूं लागला. ह्या धंद्यांत रामदूलालचें डोकें चांगलें चालूं लागलें. त्या काळांत हुगळी नदींत फार गाळ सांचलेला असल्या-मुळें व्यापारी जहाजें अनेक वेळां चिखलांत रुतून बसत. अशा जहाजावर नुसती नजर टाकून तें जहाज वर काढण्यास किती खर्च येईल, त्या जहाजावरील मालाची किती किंमत होईल वगैरे गोष्टींचे आडाखे त्याचे नेहमीं तंतोतंत जमत; ह्यामुळें अशा जहा-जांची जेव्हां लेलांवानें विक्री होई, तेव्हां रामदूलालच्या धन्यालाच तो सट्टा चांगला साधे, व त्याच्यापुढें इतर व्यापाऱ्यांस सवाल करण्याची छातीच होत नसे.

एके दिवशीं त्याच्या धन्यानें त्याजपाशीं चौदा हजार रुपये देऊन त्यास जवळच्या एका गांवास लेलांव होता, तो घेण्यास पाठविलें. वाटेनें जातांना त्याचा रस्ता गोदींतूनच असल्यामुळें तेथें तो थांबला. तेथें एक व्यापारी जहाज चिखलांत अडकून पडलेलें त्यास दिसलें. अर्थातच ह्या जहाजाचा लेलांव होईल तेव्हां आप-

णास ह्याची काय किंमत बोलतां येईल, हें ठरविण्यांत तो गढून गेल्यामुळें त्यास ठरलेल्या ठिकाणीं जाण्यास उशीर लागला, व तो तेथें जाऊन पोहोंचतो तों लेलांवाचें काम संपूनही गेलें होतें !

हा लेलांव हातचा दवडला, आतां धनी आपल्याला काय म्हणेल, अशी त्याला चिंता वाटूं लागली. इतक्यांत त्याला गोदींतल्या जहाजाचें स्मरण होऊन जुळल्यास तें तरी लेलावांत मिळवावें, असें मनांत योजून तो परत फिरला. त्याच्या अटकळीप्रमाणें लेलांवाचें काम चालू होतेंच; पण लेलावांत बोलणारे लोक तेथें फारसे नसल्यामुळें लेलांवाचा आंकडा फारसा वर चढे ना.

धन्यानें सांगितलेला लेलांव आपण हातचा दवडला, आतां ह्या लेलांवांत बोलून तरी धन्याचें हित साधावें, असें त्याच्या मनानें घेतलें; पण, धन्याला ही गोष्ट आवडली नाहीं तर ?- - -तर काय ? तो रागावणार नाहीं खास ! इतका धन्याविषयीं विश्वास पटल्यावर मग काय उशीर ? तो ताबडतोब लेलांव चढवूं लागला व इतर व्यापाऱ्यांस जेरीस आणून त्यानें तो माल चौदा हजारांस एक वार, दोन वार, तीन वार, करून विकत घेतला.

लेलांवाची रक्कम तेथल्या तेथें पटवून तो गोदींतून बाहेर पडणार, इतक्यांत एक युरोपियन व्यापारी धापा टाकीत धावतच तेथें आला, व रामदूलालवर दमबाजी झाडून, आपले पैसे मुकाट्यानें परत घेऊन चालता हो, असें दरडावूं लागला. रामदूलालही कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता ! त्यानें मालावरचा ताबा सोडण्याचें साफ नाकारिलें. तो युरोपियन व्यापारीही हट्टास पेटला. काय वाटेल तें झालें तरी बेहेत्तर; हा माल तरी तुझ्या हातीं लागूं देणार नाहींच ! अशा तो वल्गना करूं लागला; पण त्याच्या त्या गुरकावण्यास रामदूलालनें मुळींच जुमानिलें नाहीं. शेवटीं तो व्यापारी थोडा मऊ आला, व दामाजीपंताच्या साहाय्यानें कांहीं जुळल्यास पाहावें, अशा

विचारानें रामदूलालची मूठ दाबूं लागला; पण रामदूलालचा जबाब कायम. तो म्हणे, मीं हा व्यवहार धन्याकरितां केला आहे, व हा उघड उघड फायदेशीर आहे; अर्थात् असला सौदा हातचा दवडून मी धन्याशीं निमकहराम कधींच होणार नाहीं.

एकादें काम साधावयाचें असल्यास साम, दाम, दंड व भेद असे चार मार्ग असतात, व ते क्रमाक्रमानें योजिले, तरच कार्य साधतें; पण तो युरोपियन व्यापारी आपल्याच गुर्मीत असल्यामुळें त्यानें ह्या मार्गांचा उलट क्रम योजून कार्य बिघडवून टाकिलें. रामदूलालनें त्याचें अवसान ओळखलेंच होतें, यामुळें त्यानें सामोपचाराच्या गोष्टी सुरू केल्यावर रामदूलाल अधिकाधिकच ओढून धरूं लागला. अखेरीस तो व्यापारी त्या जहाजाचे वीस हजार,—तीस हजार,—चाळीस हजार,—ऐशीं हजार,—एक लाख!—आणखी शेवटीं तर एक लक्ष चौदा हजार रुपये देण्यास तयार झाला ! आतां अधिक ओढण्यांत अर्थ नाहीं, उलट नुकसानच आहे, असें पाहून रामदूलालनें अखेरीस होय म्हटलें; व तेथल्या तेथें त्या व्यापाऱ्याजवळून ठरलेल्या रकमेचा चेक घेऊन तो मालकाकडे जाण्यास निघाला.

रामदूलालनें आपल्या धन्यास आज एक लक्ष रुपये मिळवून दिले असून सुद्धां त्याला धन्यासमोर उभें राहाण्यास लाज वाटूं लागली. धन्यानें आपणांस ज्या कामगिरीवर पाठविलें, ती कामगिरी राहिली बाजूस, व आपण भलताच व्यवहार करून परत आलों ! आतां धनी कामाचें काय झालें म्हणून विचारील, तेव्हां कोणत्या तोंडानें उत्तर द्यावें, असें त्यास होऊन गेलें; तरी पण त्यानें धिटाईनें घडलेली सर्व हकीकत त्यास सांगितली. ती ऐकत असतां त्याचा धनी आश्चर्यानें थक्क होऊन गेला होता, परंतु रामदूलालनें आपल्या बोलण्याची सत्यता म्हणून त्या युरोपियन व्यापाऱ्याजवळून घेतलेला चेक जेव्हां

त्याच्या पुढें ठेविला, तेव्हां त्यास इतका हर्ष वाटला, कीं तो ताडकन उभा राहिला ! आपल्याला एका दिवसांत एक लाख रुपये मिळाले, म्हणून हा त्याचा हर्ष नसून एक लाख रुपयांसही न लालचावणारा असा असामान्य इमानी नौकर आपल्या पदरीं असल्याबद्दल त्यास एवढा आनंद झाला ! तो म्हणाला, रामदूलाल, तुझ्या ह्या इमानीपणाबद्दल ही सर्व रक्कम मी तुला बक्षीस देतों. ही रक्कम तुझ्याच कमाईची असल्यामुळें ही घेतांना तुला मुळींच संकोच वाटूं देऊं नकोस. जा. परमेश्वर तुला यश देवो.

ही देणगी रामदूलालला खरोखरच मोठी यशस्वी झाली. ह्या रकमेवर त्यानें व्यापार आरंभिला, व थोडक्याच अवधींत स्वताच्या मालकीचीं जहाजें बांधून त्यांतून अमेरिकेशीं दळणवळण सुरू केलें. त्याचें तें ऐश्वर्य पाहून अमेरिकन व्यापारी त्याला ‘ बंगालचा राथ्सचाइल्ड ’ म्हणत असत.

---

## २०. जीवितसाफल्य.

आतां जी गोष्ट सांगावयाची आहे तिचा नायक हा कांहीं कोणी राजेरजवाड्यांपैकीं नाहीं, कोणी बडा पदवीधर नाहीं, किंवा कोणी मोठा हुद्देवाला कामगारही नाहीं; फार काय, पण तो राजकीय, सामाजिक किंवा धार्मिक बाबतींत लुडबूड करून स्वतास कोणी तरी फार मोठा समजणारा असा आधुनिक देशभक्तही नाहीं; इतकेंचसें काय, पण तो ‘ समर्थाचिया घरचें श्वान ’ ह्या कोटींत सुद्धां मोडणारा नाहीं. हा नायक असा मात्र आहे, कीं त्याच्या थोर अंत:करणाचा ठाव फारच थोड्या जणांस लागला असेल; व ज्यांस हा ठाव लागला तो तरी पुढील गोष्टीमुळेंच !

नफरचंद्र कुंडू हा भवानीपूरचा रहिवासी असून खाडिलकरांनीं वर्णिलेल्या व दिवाकरानें रंगविलेल्या विख्यात कारकुंड्यांच्या पेशांतला होता. होय, कारकुंडाच! गरीब बिचारे कारकुंडे! सूर्योदयाबरोबर कामास जुंपून घेणारे कारकुंडे! सूर्यास्तानंतरही कामाचें जूं मानेवरून खालीं उतरून ठेवण्यास असमर्थ असलेले कारकुंडे! रात्रौ घरीं जातांना, स्वप्नांत विश्रांति मिळेल ह्या भीतीनें बगलेंत कित्येक लांब लांब लखोटे घेतलेले कारकुंडे! अर्धपोटीं काम करणारे कारकुंड! मिळणाऱ्या पगारांत मुलांलेंकरांच्या वाजवी गरजा सुद्धां भागवितां येत नसल्यामुळें स्वतः फाटक्या कपड्यांस व तुटक्या जोड्यांसही महाग असलेले कारकुंड! जगाचा विस्तार पांच खंडांत न मानितां आपलें हापीस हेंच सर्व जग असें मानून आयुष्याच्या पंचावन्नाव्या वर्षास किती अवकाश आहे, ह्याचा नित्य हिशोब करून पाहाणारे कारकुंडे!........परंतु, नफरचंद्राच्या कुंडलींत असा कांहीं योग होता, कीं दीन कारकुंड्यांच्या पेशांत जन्मास येऊन सुद्धां त्यानें आपलें नांव ह्या जगांत अजरामर करून जावें.

एके दिवशीं नफरचंद्र हा नेहमींप्रमाणें हापिसांत जात असतां रस्त्यांत गटाराच्या एका कुंडीचें तोंड उघडें केलेलें असून कांहीं मजूर तेथें काम करीत असलेले त्याच्या दृष्टीस पडले. इतक्यांत तेथील एका मजुराचा पाय घसरून तो आंत पडला, व त्याच्या धक्क्यानें पूर्वीं आंत उतरलेला एक मजूरही तोल जाऊन खालीं पडला. आंतील विषारी वायूमुळें दोघेही लगेच बेशुद्ध झाले, हें पाहून इतर मजुरांच्या तोंडचें पाणी पळालें, व ते सैरावैरा धावत व ओरडत सुटले. त्यांचा मुकादमही तेथेंच होता; पण तोही स्वतः कांहीं एक न करितां नुसती तोंडपाटीलकी करून व ज्याला त्याला शिव्या हांसडून खालीं उतरण्यास सांगूं लागला. खालीं उतरून त्या दोघां मजुरास बाहेर काढण्यास कोणीच धजे ना.

नफरचंद्र जवळ येतांच तेथील सर्व प्रकार त्याच्या ताबडतोब ध्यानांत आला. त्यानें झटकन आपली कोटटोपी काढिली व शिडीच्या पायऱ्यांवरून तो सरसर खालीं उतरला.

आतां मात्र मुकादमाची पुरी घाबरगुंडी उडाली, व ह्या माणसांस बाहेर न काढिलें तर लोक आपल्यालाच जबाबदार धरितील अशी भीति वाटून तो खरा प्रकार आहे तरी काय हें पाहण्यासाठीं कुंडीशीं वांकला. तेव्हां त्याला आंत काय दिसलें असेल बरें? त्या दोघां मजुरांना खांद्यावर टाकून नफरचंद्र निम्मे पायऱ्या वर आला होता; परंतु विषारी वायूचा त्याच्यावरही लगेच परिणाम झाल्यामुळें तोही बेशुद्ध स्थितींत त्या मजुरांसह उभा राहिला होता. मुकादमानें मोठ्या शिताफीनें त्यांच्या अंगाभोंवतीं दोराचे वळसे घेऊन इतर मजुरांच्या साह्यानें त्यांस वर ओढून घेतलें; पण काय? त्या दोघां मजुरांनीं व नफरचंद्रानेंही वर येण्यापूर्वींच ह्या जगास कायमचा राम राम ठोकिला होता!

नफरचंद्राच्या अंत्यविधीच्या प्रसंगीं बंगालचे गव्हर्नर सर अँड्र्यू फ्रेझर हे स्वत: हजर राहिले, व त्यांनीं तेथें जमलेल्या जनसमुदायापुढें नफरचंद्राच्या अंगच्या अलौकिक गुणांची प्रशंसा केली. नफरचंद्राचें चिरस्मरण राहावें म्हणून त्याचें एक स्मारक भवानीपुरांत एका प्रमुख भागीं केलेलें असून त्यावर पुढें दिल्याप्रमाणें शिलालेख कोरिलेला आहे.

**हें स्मारक**

**नफरचंद्र कुंडू**

**ह्यांनीं**

दोन मुसलमान मजुरांचे प्राण गटाराच्या कुंडींतून वांचविण्याची शिकस्त करीत असतां मोठ्या शौर्यानें आपले स्वताचे प्राण खर्ची घातले, ह्या गोष्टीच्या स्मरणार्थ त्यांच्या युरोपियन व हिंदी चाह-

त्यांनीं वर्गणी जमवून त्यांतून उभारिलें आहे. हे रामकृष्ण मिशनचे सभासद असून ह्यांनीं जातिभेद, धर्मपंथ अगर वर्णभेद विचारांत न घेतां मानव जातीच्या उपयोगीं पडण्याचें व्रत स्वीकारिलें होतें.

जन्म—२२ मार्च १८८१. मृत्यु—१२ मे १९०७.

अशा रीतीनें नफरचंद्र गेला; परंतु त्याची कीर्ति मागें शिल्लक राहिली.

---

## २१. कनवाळूपणा.

—:o:—

पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्या थोर पुरुषाच्या आंगच्या कनवाळूपणाच्या गोष्टी सांगत बसल्यास त्यांचा एक स्वतंत्र ग्रंथच होईल. एके दिवशीं ते हुगळी नदीच्या घाटावर हिंडत असतां त्यांची दृष्टि तेथेंच एका पायरीवर बसलेल्या म्हाताऱ्याकडे गेली. त्या म्हाताऱ्याच्या चेहेऱ्यावर उद्विग्नता व निराशा ह्यांचा फार खोल ठसा उमटलेला असून त्याला जीविताचा सुद्धां कंटाळा आलासें दिसत होतें. पंडितजींनीं कांहीं वेळ त्याच्याकडे टक लावून पाहिलें, व ह्या माणसाचा दुःखावेग शक्य तर कमी करण्याचा त्यांनीं मनांत निर्धार केला. थोडा वेळ इकडे तिकडे केल्यावर साहजिक रीतीनें आल्यासारखें दाखवून ते त्याच्या शेजारीं जाऊन बसले, व अनेक युक्त्या करून त्या म्हाताऱ्यानें कोठून तरी संभाषणास सुरुवात करावी म्हणून त्यांनीं नाना तऱ्हेचे विषय काढिले; पण तो म्हातारा एक तर कांहीं बोलेचना, आणि बोललाच, तर फक्त 'हूं' एवढें म्हणे, बाकी दुसरा द्व्यक्षरी शब्दसुद्धां त्याच्या तोंडांतून निघेना; परंतु पंडितजींच्या चिकाटीनें त्याच्या उद्विग्नतेचें पटल हळू हळू दूर होऊं लागलें, व मोठ्या नाखुषीनें का होई ना, पण त्यानें आपलें नांव, गांव व

उद्विग्नतेचें कारण सांगितलें. त्यांच्या संभाषणांत असें निष्पन्न झालें, कीं त्या म्हाताऱ्यानें आपल्या मुलीस सुस्थळ मिळावें म्हणून वडिलोपार्जित घर गहाण टाकून खूपसें कर्ज काढिलें, परंतु पुढें कर्जाची फेड करणें मुष्किलीचें झाल्यामुळें सावकारानें त्याजवर फिर्याद केली. दुसऱ्या दिवशीं न्यायाच्या कचेरींत जाबजबान्या होऊन आपली अप्रतिष्ठा होणार, व एवढ्यावरच न थांबतां घरदार, चीजवस्त, सर्व कांहीं सावकाराची भर करण्यासाठीं द्यावें लागणार, आणि आपल्याला आज तीन पिढ्यांचें घर सोडून बायकांमुलांसह देशोधडीस जावें लागणार; ह्यापेक्षां नको तें जीवित, असल्या प्रकारचे विचार त्याच्या डोक्यांत घोळत असल्यामुळें त्यास इतकी खिन्नता आली होती. पंडितजींनीं आणखी चौकशी करूं नये, म्हणून तो उठला व दुसरीकडे चालता झाला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं न्यायाची कचेरी उघडली नाहीं तोंच पंडितजी तेथें गेले, व नाझर, कारकून वगैरे मंडळींशीं गप्पा मारितां मारितां, आज कोणकोणते खटले आहेत, त्या म्हाताऱ्यावर किती बोजा आहे, फिर्यादी सावकार कोण आहे, वगैरे चौकशी केल्यावर त्यांस असें दिसून आलें, कीं म्हाताऱ्यास घरदार जाण्याची भीति वाटत होती ती यथार्थ होती. पंडितजींची स्थिति स्वतः हलाखीचाच होती, तरी त्यांनीं खिशांतून नोटांचें पुडकें काढिलें, व कर्जाच्या भरपाईची नाझराकडून पावती घेऊन तेथून पाय काढिला. आणखी एका तासानें तो बिचारा म्हातारा शून्यमनस्क होऊन जे काय अब्रूचे धिंडवडे व्हावयाचे असतील ते होऊं द्याच ! अशा निश्चयानें तेथें येऊन बसला, तों बेलिफानें त्यास घरीं निघून जाण्यास सांगितलें. तुम्हीं कर्जफेड केल्यामुळें आतां तुमचें एथें कांहीं काम नाहीं, ह्या बेलिफाच्या शब्दांचा त्यास अर्थच कळे ना ! कर्जफेड झाली ? आणि ती केली कोणीं ? म्हाताऱ्यानें पुष्कळ खोद-

खोदून विचारिलें, पण त्यास समाधानकारक उत्तर कोणीच देई ना.

आपल्यासाठीं एवढी झीज सोसणारा असा पुण्यपुरुष कोण असावा, असा त्यानें आपल्या मनाशीं पुष्कळ विचार करून पाहिला. नदीतटाकीं रिकाम्या उठाठेवी करणाऱ्या माणसाचेंच बहुधा हें काम असावें, असा त्यास अंदेशा आला, पण ह्याचा कायम निर्णय कसा व्हावा? नेहमीं गुप्तदान करणाऱ्या पंडितजींच्या उजव्या हातानें केलेलें कृत्य त्यांच्या डाव्या हातास तरी कळेल तर ना?

## २२. वचनासक्ति.

मागें एका गोष्टींत वर्णन केल्याप्रमाणें रामदूलाल सरकार हे एका व्यापाऱ्याच्या घरीं पांच रुपड्यांवर उधारी वसूल करणारा पोरगा म्हणून काम करीत असतां एके दिवशीं सहज थट्टेनें तेथील पुजारीबोवा त्यास म्हणाले, रामदूलाल, तुझे ग्रह मोठे उच्चीचे दिसतात! बेट्या कोट्याधीश होणार तूं! आणखी वीस वर्षांनीं—मी सांगतों,—तूं मोठा कोट्याधीश सावकार होशील; पण मग आम्हांला रुपयाभर दक्षणा तरी देशील का? का धक्के मारून घालवून देशील? रामदूलाल लागलीच म्हणाला, भटजी, असे रुपयावरच संतुष्ट कां राहतां? मी वीस वर्षांत कोट्याधीश झालों, तर तुम्हांला दक्षिणा म्हणून रुपये दहा हजार देईन! मग तर झालें ना? भटजी म्हणाले, रामदूलाल, तूं सगळी थट्टाच समजतोस होय? छेः छेः! थट्टा म्हणेल कोण! मला आज रुपये पांच तर मिळतातच. ह्या हिशोबानें वीस वर्षांत मी कोट्याधीश होतोंच! ह्यांत थट्टा कसली? रामदूलालही तितक्याच गंभीरपणानें म्हणाला.—तर मग, दे लिहून कागदावर! भटजी हसत हसत म्हणाले.

रामदूलालनें जवळच कोपऱ्यांत पडलेलें एक चिठोरें उचलून घेतलें, व त्यावर तो लिहूं लागला. मी रामदूलाल, पगार रुपये पांच, आज रोजीं लिहून देतों, कीं मी आजपासून आणखी वीस वर्षांनीं कोट्याधीश झाल्यास हें भविष्य वर्तविल्याबद्दल आमचे प्रख्यात ज्योतिषी पंडित........ह्यांस अल्पशी दक्षिणा म्हणून रुपये दहा हजार देण्याचें कबूल केलें आहे. भटजींनीं हसत हसत तो कागद चुरगळून कनवटीस लाविला.

ह्या गोष्टीस पांच वर्षें लोटलीं नाहींत तों रामदूलालचा पगार पांचाचा पन्नास व पन्नासांचा पांचशें झाला! कर्मधर्मसंयोगानें—मागें एका गोष्टींत वर्णन केल्याप्रमाणें—पांच रुपड्या मिळविणारा रामदूलाल दहा वर्षांच्या अवधींत लक्षाधीशही झाला, व भटजीबोवांनीं थट्टेनेंच का होई ना, पण भाकित केल्याप्रमाणें पुढल्या दहा वर्षांत रामदूलाल कोट्याधीश खास होणार, असाही रंग दिसूं लागला! भटजीबोवांस इतक्यांतच घाई करावीशी वाटे ना; मात्र त्यांनीं तें चिठोरें काळजीपूर्वक जतन करून ठेविलें होतें, व वेळ आल्यावर पाहूं, असें ठरविलें होतें. ती वेळ येण्याच्या आधींच भटजी बोवांनीं डोळे झांकिले! तथापि मरतांना त्यांनीं आपल्या मुलांस जवळ बोलावून त्या चिठ्ठीचा इतिहास सांगितला, व ती त्यांच्या हवालीं करून म्हटलें, बाळांनो, ही चिठ्ठी आणखी पांच वर्षें जतन करून ठेवा. पांच वर्षांनीं रामदूलाल खरोखरच कोट्याधीश होईल अशीं चिन्हें दिसत आहेत; आणि तो खरोखरच कोट्याधीश झाला, तर ह्या थट्टेनें लिहिलेल्या चिठ्ठीवरूनही तुम्हांस तो दहा हजार रुपये देण्यास चुकणार नाहीं.

पुढल्या पांच वर्षांत रामदूलाल खरोखरच कोट्याधीश बनला, व त्याच्या चांगुलपणाची कीर्ति सर्व बंगालभर पसरली. भटजीबोवांच्या मुलांनीं ती चिठ्ठी दाखवून आपल्या नशिबाची परीक्षा

पाहाण्याचें ठरविलें, व ते रामदूलालच्या भेटीस गेले. रामदूलालकडे चौक्यापहारे मुळींच नव्हते, त्याच्या भेटीस सर्वांस मुक्तद्वार असे, ह्यामुळें त्याची भेट होण्यास त्यांस मुळींच अडचण पडली नाहीं. त्याचा लेख ' स्टांपा ' वर नव्हता, किंवा त्यास टिकीट लाविलेलें नव्हतें; तो कागद रजिस्टर झालेला नव्हता, किंवा त्या लेखाबद्दल कोणी साक्षीदारही नव्हते ! पण ह्या कायदेशीर अडचणींचें रामदूलालला काय होय ? त्यानें आपलें हस्ताक्षर ओळखिलें. वीस वर्षांपूर्वीचा तो हास्यकारक प्रसंग त्याच्या डोळ्यांपुढें हुबेहूब उभा राहिला. थट्टामस्करीनेंच का होईना ? पण अचाट भविष्य वर्तविणाऱ्या त्या ज्योतिषी भटजींना—व ते हयात नसल्यामुळें त्यांच्या मुलांना कबूल केलेली दहा हजार रुपये दक्षिणा देण्यास त्यानें मुळींच माघार घेतली नाहीं. फक्त चिठ्ठी घेऊन येणारे इसम हे भटजीबोवांचे औरस पुत्रच होत ह्याबद्दल त्यानें खात्री करून घेतली, व एवढे पैसे एकदम हातीं आल्यास ते त्यांचा दुरूपयोग करितील ह्या भीतीनें त्यानें तेवढ्या रुपयांची उत्तम जमीन घेऊन त्यांच्या नांवें करून दिली. ह्याला म्हणावें वचनासक्ति !



# बालवीरानें पाळावयाचे दहा नियम.



१. बालवीराची दानत विश्वसनीय असावी.

२. बालवीरानें राजा, आईबाप, स्वदेश, गुरुजन, धनी आणि नौकर ह्या सर्वांच्या जिवास जीव देत असावें.

३. बालवीरानें नेहमीं परोपकार करीत असावें.

४. बालवीराचें वर्तन दुसऱ्या बालवीरांबरोबर भावाप्रमाणें व इतरांबरोबर मित्राप्रमाणें असावें.

५. बालवीराची वागणूक विनयशील व सभ्यपणाची असावी.

६. बालवीरानें प्राणिमात्रावर दया करावी.

७. बालवीरानें आपले आईबाप, गुरुजन व वरिष्ठ ह्यांच्या आज्ञा बिनतक्रार पाळाव्या.

८. बालवीरानें सदासर्वकाळ आनंदी वृत्ति ठेवावी.

९. बालवीरानें काटकसरीनें राहावें.

१०. बालवीरानें आपले आचार, विचार व उच्चार पवित्र राखावे.

# आपटे आणि मंडळी.

## ग्रंथप्रकाशक आणि ग्रंथकारसाहाय्यक.

ग्रंथप्रकाशनाचें काम महाराष्ट्रांत किती एक मंडळ्या, छापखानेवाले, ग्रंथविक्रय करणारे आणि इतर गृहस्थ करीत आले आहेत; परंतु त्यांच्या मार्फत ग्रंथ प्रकाशित करणें हें ग्रंथकारांस अनेक कारणांस्तव अडचणीचें वाटत असून पुष्कळदां नाइलाजास्तव त्यांस तो व्यवहार करावा लागतो. नवीन ग्रंथकाराचे ग्रंथ तर प्रकाशित होणेंही बरेंच कठीण पडतें, असा अनुभव आहे.

ग्रंथकर्त्यांच्या सर्व अडचणी लक्षांत घेऊन त्यांस खरें साहाय्य मिळावें, आणि ग्रंथकार व ग्रंथप्रकाशक ह्यांमध्यें श्रमविभागाच्या खऱ्या तत्त्वांनुसार व्यवहार चालून ग्रंथलेखन व ग्रंथप्रकाशन ह्या धंद्यांस व्यापारी वळण लागावें, हा ह्या मंडळीचा मुख्य उद्देश आहे. तूर्त ह्या मंडळीनें पुढील व्यवहार सुरू केले आहेत.

१. **किरकोळ अडत**—एखाद्या पुस्तकाच्या कांहीं प्रती जांगड किंवा रोखीनें घेऊन त्या माफक अडतीनें विकून देणें.

२. **ठोक अडत**—पुस्तकाच्या एखाद्या आवृत्तीच्या सर्व प्रती जांगड किंवा रोखीनें घेऊन माफक अडतीनें विकून देणें.

३. **छपाई**—ग्रंथकर्त्यापासून वाजवी खर्च घेऊन माफक मनोतीवर पुस्तक ग्रंथकर्त्याच्या इच्छेप्रमाणें छापवून देणें.

४. **प्रकाशन**—ग्रंथकर्त्याचा स्वामित्वाचा हक्क कायम ठेवून, व त्याचा प्रत्येक आवृत्तीचा मोबदला ठरवून, स्वताच्या पैशानें व स्वताच्या जबाबदारीनें ग्रंथप्रकाशन करणें.

नारायण विठ्ठल आपटे,

**आपटे आणि मंडळी, ५५२, नारायण पेठ, पुणें.**

## ...कास अस... ठीं पुस्तकें

...... ...ाराम ।वनायक आपटे, एम्. ए., बी. एस. सी.

१. यामिक प्रदीप. प्रथम भाग.—ह्या पुस्तकांत महाविद्यालयांतील नूतन विद्यार्थ्यांकरितां यंत्रशास्त्राचीं मूलतत्त्वें ऊहापोहात्मक पद्धतीनें लिहिलीं आहेत. किंमत २ रुपये ६ आणे.

लेखक—**अनंत विठ्ठल आपटे**, बी. ए., एस. टी. सी. डी.

१. **बालसंवाद, प्रथम पंचक**—ह्या पुस्तकांत शाळांतून समारंभांच्या वेळीं करून दाखविण्यास सर्व प्रकारें योग्य व सोईचे असे मनोरंजक व बोधप्रद गद्यपद्यात्मक संवाद आहेत. मुलांमुलींस वाचण्यास फारच उत्तम. किं. ६ आणे.

२. **बंगाली वीरांच्या कथा**—ह्या पुस्तकांत बंगाली गृहस्थांच्या मनोरंजक, बोधप्रद व अनुकरणीय अशा गोष्टी आहेत. मुलांमुलींनांच काय पण मोठ्यांनाही वाचनीय असें हें पुस्तक आहे. किंमत ५ आणे.

लेखक—**शंकर गोपाळ घैसास.**

१. **प्रल्हादजयंत**—किंमत १२ आणे.

२. **जयद्रथ**—किंमत ८ आणे.

हीं मुलांस प्रयोग करण्यास फारच उत्तम अशीं स्त्रीपात्रें नसलेलीं नाटकें आहेत. यांत रसपरिपोष उत्कृष्ट साधलेला आहे. एरव्हीं मुलांस वाचण्या मनोरंजक व बोधप्रद आहेत.

लेखक—**यशवंत विठ्ठल आपटे व विनायक रामचंद्र घोरपडे.**

१. **चिमखडा बालवीर**—ह्या पुस्तकांत बालवीरशिक्षणासंबंधाचीं आरंभींचा ... माहिती दिली आहे. नवीन होणाऱ्या बालवीरांनीं आणि बालवीर-शिक्षक...ा अवश्य वाचून संग्रहीं ठेवावें. किंमत ५ आणे.

लेख... **...हरि फडके.**

१. **माझी तीर्थया...** ...ह्या... ...र हिंदुस्तानांतील हिमालयांतल्या सुद्धां सर्व यात्रांचें सविस्तर वर्णन अ... हिमालयाचा सुंदर नकाशाही आहे हें यात्रा करणारांस अतिशय उपयुक्त; इतरांस वाचनीय आहे. किंमत २ रुपये.

लेखक—**नारायण विठ्ठल आपटे.**

यांच्या सर्व पुस्तकांची यादी निराळी दिली आहे.

———